साहित्य सहकार प्रकाशन : ३

# ए ल्गा र !

दोन सुशील जीवांची एक प्रेमकथा

लेखक

श्री. ना. पेंडसे

आवृत्ति दुसरी : १९७३

किंमत अडीच रुपये

*

—प्र का श क—

वासुदेव विष्णु भट

कार्यवाह

साहित्य सहकार संघ

लिमिटेड,

खाडिलकर रस्ता, मुंबई ४.

*



*

—मु द्र क—

मधुकर शंकर साठे

दि प्राज्ञ प्रेस, ३१५

गंगापुरी, वाई, जि. सातारा.

*

## विश्व झालिया वन्हि

विश्व वेढे वन्हीपायीं—आक्रोश पाण्याचा
'संतमुखें व्हावें पाणी'—बोले मुक्ता.
विश्व होई संतशून्य--पेटतां हा वन्हि
कुठं जाऊं पाण्यापायीं--मुक्ताबाई ?
हृदयाच्या भांडीं--मानव्याचं पाणी
ओतूं चला वन्हीमाजीं--शांतवाया.

प्रस्तुत कथेंतील—

सर्व प्रसंग मुंबई आणि मुंबईपासून पाऊणशें मैलावर असलेल्या हर्णै बंदराच्या पंचक्रोशींत घडलेले आहेत.

सर्व व्यक्ती त्यांच्या नांवासकट माझ्या कल्पनेंतील आहेत. कोणीहि आपला चेहरा शोधण्याचा उपद्व्याप करूं नये.

बऱ्या वाईट गुणांची जबाबदारी माझी असली तरी अप्रत्यक्ष श्रेय प्रसिद्ध साहित्यिक श्री. माधव मनोहर यांना आहे. त्यांच्या जवळ या कथेसंबंधीं मीं बोललों; त्यांनीं प्रोत्साहन दिलं आणि मी लेखनाला उद्युक्त झालों, अशी थोडक्यांत वस्तुस्थिति आहे.

नायक कादर याला असाध्य व्याधि ( सेरेब्रो हेमरेज ) होऊन त्यांत त्याचा अंत होतो. या व्याधीच्या लक्षणांविषयींचा जो भाग कथेंत आला आहे तो "This Above All" या इंग्रजी कादंबरींतून घेतलेला आहे. ज्या परिस्थतींतून कादरला जावं लागलं त्या परिस्थितींत त्याला दुसरीहि एक व्याधि होण्याचा तितकाच संभव होता. अनेक कारणांनीं त्या संबंधीची संपूर्ण शास्त्रीय माहिती मिळविणं मला अशक्य झालं. विषय शास्त्रीय पडल्यामुळें कल्पनेनं कांहींतरी लिहिण्यापेक्षां उसनवारी परवडली असं वाटल्यामुळं नाखुषीनं प्रस्तुत उचल केली आहे. लक्षणासंबंधीचा हा भाग वगळला तर इतर बरेवाईटपणाची सर्व जबाबदारी माझी आहे.

लेखनकाल
ऑक्टोबर—नोव्हेंबर
१९४७

श्री. ना. पेंडसे

गो ख ले वा डी
भवानी शंकर रोड,
दादर, मुंबई २८

## : १ :

देवीची यात्रा आणि दादूमियाची जत्रा हे दोन प्रसंग आमच्या साखर-पेंडीला दिवाळीसारखे असतात. दादूमियाच्या पीराजवळ पौषांतल्या पौर्णिमेला मोठी जत्रा भरते. ही जत्रा मुख्यतः मुसलमानांची आहे. पण हिंदू लोक या जत्रेंत इतक्या उत्साहानं भाग घेतात कीं, परक्या माणसाला हा उत्सव कोणत्या जमातीचा आहे, हें कळणं कठीण असतं. पौषांत दर वर्षी हजारों हिंदुमुसलमान आपला परकेपणा, आणि सांसारिक दुःखं विसरून या दिवशीं बेहोष होतात, एकमेकांना मिठ्या मारतात न् दुसऱ्या दिवशीं पुन्हा आपल्या व्यवसायाकडे वळतात. दादूमियाचा पीर हें एक साखरपेंडीचं कोडं आहे. तो फार जुना—शिवाजीच्या काळांतला आहे, असं म्हणतात. खेडेगांवांत प्रसृत असलेल्या ऐतिहासिक आख्यायिकांना पुरावा जवळ जवळ नसतोच. पीराचा कालनिर्णय करायचा म्हटलं, तर त्याच्या बांधकामावर कसलाहि मागमूस नाहीं. बांधकाम मात्र अतिशय मजबूत आणि जुनं आहे. आमच्याकडे कोणत्याहि बांधकामाची मजबुती पीराशीं तुलना करून ठरविली जाते काका शिंत्रे नव्वद वर्षांचे आहेत——त्यांच्या आजोबांच्या लहानपणीं तो पीर फार जुना मानला जाई ! तेव्हां शिवकालच्या आसपास त्याची बांधणी झाली असणं शक्य आहे. असं सांगतात कीं दुर्गादेवीची प्राणप्रतिष्ठा साखरपेंडीच्या महापुरुषानं केली. त्या दिवशीं 'दादा मिराशी' नांवाच्या एका सत्प्रवृत्त ब्राह्मणाकडे पौरो-हित्याचं काम महापुरुषानं नेमून दिलं होतं. दादा मिराशींच्या हलगर्जीपणा-

मुळं चंद्रोदयाचा मुहूर्त थोडासा टळला. पौषांतल्या पौर्णिमेचा तो मुहूर्त होता. मुहूर्त टळला ! महापुरुष क्रुद्ध झाला ! ! त्याचे लालबुंद डोळे त्या गरीब ब्राह्मणाला फाडून खाऊं लागले.

"हलगर्जी ब्राह्मणा, तुझ्या मूर्खपणानं या गांवचं केवढं नुकसान केलं आहेस याची तुला कल्पना नाहीं. तुला केवढीही शिक्षा केली, तरी ती थोडीच होणार आहे. जा–या पापाचं फळ चालू जन्मांत मुसलमान होऊन भोगशील."

दादा मिराशी पश्चात्तापानं दग्ध झाला. त्यानं उःशापाची भीक मागितली. शेवटीं महापुरुष उद्गारला--

" तूं जरी मुसलमान झालास तरी हिंदूसुद्धां तुझ्या थडग्याला तितक्याच आपलेपणानं भजतील. तुझ्या पुण्याईच्या जोरावर लोकांचे मनोरथ पूर्ण करण्याचं सामर्थ्य तुझ्या थडग्यांत राहील. "

दादा मिराशींना कुणी बाटवलं नाहीं. पण तेजस्वी पुरुषाची ती शापवाणी त्यांच्या कानांत घुमून घुमून शेवटीं ते मशिदींत जाऊं लागले ! त्यांच्या मरणोत्तर दादा मिराशी या नांवावरून " दादूमियाचा पीर " जन्माला आला. पंचक्रोशींतले भाविक हिंदु पीराला नाना तऱ्हेने नवस करतात-गंधाक्षता फुलांनीं पीराची पूजा करण्याचे सुद्धा नवस करतात. अन् असं म्हणतात कीं तो नवसाला पावतो. नवशा पीर म्हणून उल्लेख करणारे लोकसुद्धा आहेत. विशेषत: साखरपेंडीच्या गाडीवाल्यांच्या तोंडी हें नांव फार आहे. "एथून नवशापीराशीं जावं एवढं अंतर आहे"--या चालीवर ते बोलत असतात. दादूमियाच्या पीराबद्दल सर्व हिंदूंना अतिशय आपलेपणा वाटतो. देवीची यात्रा न् नारळी पौर्णिमा सोडली, तर पीराच्या जत्रेइतका उत्साह कधींच दृष्टीस पडत नाहीं. पौषांतल्या पौर्णिमेला मेण्यांतून पीराचा दगड सावित्रीला नेतात. तिथं महापुरुषाच्या डोहांत त्या दगडाला स्नान घालून पुन्हा जागेवर आणून ठेवतात. सदू महाराचा खालु मिरवणुकीबरोबर असतो. सदूच्या सनईतून बाहेर पडणारे गोड सूर माझ्या कानांत अजूनहि जसेच्या तसे उमटतात. हा एक प्रसंग सोडला तर मात्र पीराची सारी व्यवस्था न्

सोपस्कार मुसलमानांकडून अस्सल मुसलमानी थाटांत होतात. पीराची काळजी घेण्याचं काम एका फकिराकडे आहे. त्याचा उदरनिर्वाह गांवांतल्या भिक्षेवर न् पीराच्या दानावर चालतो. तिन्हीसांजा तो भिक्षेला बाहेर पडतो. " ऑ...ल्क ! " करून दारापुढं उभा राहिला कीं एकाहि हिंदुकडून विन्मुख परतत नाहीं. काखेंत दोरीनं अडकविलेलं त्याचं शिंगाचं लांबट तसराळं पीराकडे जाईतों तांदुळानं भरून जातं. दादूमियाच्या जत्रेला मुसलमान लोक साऱ्या गांवांतून द्रव्य गोळा करतात. गळयांत ढोलकं अडकवून चाललेला एक म्होरक्या आणि त्याच्यामागून ऐटबाज पोशाख केलेली चारपांच वृद्ध मुसलमान मंडळी अशा थाटांत ते बाहेर पडतात.

"भाकुम् कुम्-भाकुम्कुम् भॉक-भॉक ! दादूमिया आलाय व्ह दादा" ढोलक्याचा आवाज करून ही आरोळी त्यांनीं ठोकली कीं मुकाटपणें आठ आणे--रुपया काढून द्यायचा हें सर्वांच्या अंगवळणी पडून गेलेलं आहे.

कोळीवाडयाच्या तिठ्यापासून सावित्रीच्या वाळवंटापर्यंत भली मोठी जत्रा भरते. मिठाई, खेळणीं आणि नाना वस्तूंचीं दुकानं तिथं एक दिवसात उभीं राहतात. रात्रीं किटसन् लाईटच्या रोषणाईनं जिकडे तिकडे झगझगाट होतो. आजूबाजूच्या गांवांतले अनेक बायाबापडे-लहान मुलं ही मजा लुटायला बाहेर पडतात. हजारों रुपयांची उलाढाल त्या दोन दिवसांत होते.

दादूमियाच्या जत्रेसारखे प्रसंग गांवांत आले की माझ्या अंगांत नुसतं भूत संचारत असे. भटजीचा मुलगा-त्याच्याजवळ जत्रेंत उडवायला पैसा कोठचा असणार ? पण आयुष्यांतला आनंद हा काय पैशानंच निर्माण होतो ! वृत्ती दिलखुलास असली म्हणजे आनंद मागून धांवत येत असतो. त्यावेळचं माझं आयुष्य आठवलं, म्हणजे आतां मला आश्चर्य वाटतं. जत्रेसारख्या सणाच्या दिवशीं अंगांत घालायला नवीन सदरासुद्धां नसायचा. आदल्या दिवशीं माझी कोण गडबड असायची. रिंग्याच्या फेंसाखाली सदरा घांसून घासून त्याचा कीस पडायची वेळ यायची. एवढं करूनहि कोवळया सुपारीचे

न् काजूचे सदऱ्यावर पडलेले डाग दाद देत नसत. आजुबाजूचा प्रदेश पांढरा स्वच्छ झाल्यामुळं बेटे अधिकच खुलून दिसायचे! एकीकडे आई दम देत असायची!

"—— मेल्या थांब हो, कापडाचं कातडं झाल्यावर धुवायला काढ नी पायलीभर रिंगं फुकट घालव."

जगांतल्या इतर सर्व मुलांप्रमाणेंच मीहि आई वाटेल तें बोलली, तरी धूप घालीत नसें. खरी भीति अण्णांची असायची. संध्याकाळीं अण्णा देवीच्या देवळांत जायच्या मुहूर्तावर माझी ही मोहीम निघायची. तरीसुद्धां धुतांना मधूनच अण्णा येत आहेत कीं काय याची चाहूल घ्यावी लागे. "शिंचो——!" करून अण्णा ओरडले म्हणजे माझ्यासारखा तगडा मुलगा सुद्धां त्याचं बोलणं 'आदरान' ऐके. अण्णाच्या तोंडाचं काम केव्हां हातावर येईल कुणी सांगावं? अशा धकाधकींत सदरा धुऊन वाळत घालायचा. दुसऱ्या दिवशीं वाळलेला सदरा वळकट्यांखाली चेपून ठेवायचा. अशा लॉन्ड्री-इस्त्रींतून बाहेर पडलेला सदरा पेहरून मी दादूमियांची जत्रा साजरी करीत असें. पण मला त्याचं फारसं वैषम्य कधीं वाटलं नाहीं. सारीं रात्रच्या रात्र जागरण कर, चाहेल तसं भटक, कोणी मित्रानं मिठाई दिली तर बकाणा मार,—— असा तो दिवस आम्ही साजरा करीत असूं.

आतां पैसा खेडेगावांतसुद्धा फार स्वस्त झाला आहे. दादूमियाच्या जत्रेकरिता आमच्या छोटूला कोणताच विचार न करतां मी चार आणे काढून देतों. अशावेळीं लहानपणचे दिवस माझ्या डोळ्यासमोर उभे राहा-तात. जत्रेंत उडवायचा पैसा तर जाऊं द्याच; नुसती शाईची पुडी घ्यायची तरी भल थोरलं प्रश्नचिन्ह उभं राहात असे. अण्णांकडून एक दिडकी पदरांत पाडून घ्यायची, तर खडसून विचारलेला जमाखर्च सादर करावा लागे. मध्यें किती वांधे निघतील, पत्ता नसे. शाईची पुडी हवी असली, म्हणजे तांदूळ भाजून त्याची भुकटी वापरायला अण्णा सांगायचे! कित्येक वेळां सुंदराच्याकडे वशिला लावून तिच्या कडोसरीचा पैसा घ्यावा लागे. तसे

आम्ही खाऊन पिऊन सुखी होतों-- म्हणजे आगरांतली लवंगी मिरची न् लागेल तेवढा ताकभात याची आम्हाला कधींच ददात नव्हती दारीं एक म्हैस न् एक गाय होती. दुधाचा विक्रय करायचा नाहीं, यावर अण्णांचा फार कटाक्ष. अण्णांच्या ज्या फारच थोड्या गोष्टी मला फार आवडत, त्यांत हा कटाक्ष एक होता. सकाळचं माझं धारोष्ण दूध कधीं चुकलं नाहीं. मी एवढा थोराड न् तगडा आहें—न् माझाच मुलगा छोटू. साखरपेडीचे सारे लोक म्हणतात—"रघुदादा, इतका नाजुक मुलगा शोभत नाहीं तुम्हाला." त्यांच म्हणणं खरं आहे. पण त्यांत छोटूचा किंवा माझा अपराध काय आहे? दारच्या धारोष्ण दुधावर पोसलेला मी—कशाला करावी छोटूची माझी तुलना? पाण्यात थोडसं दूध टाकलेलं रोजच्या रतीबाचं मिश्रण छोटूला देताना लहानपणचं माझं आयुष्य आठवतं न् डोळ्यांत टिपं उभीं राहतात. कालाचा काय महिमा आहे! 'यालाच लोक सुधारलेलं जग' म्हणून डोक्या-वर घेतात! घरचं दहा-बारा मण भात होतं, तितकीच सुपारी होती न् शंभर नारळाचं उत्पन्न होतं. साखरपेंडीची वृत्ती अण्णांकडे होती, त्यामुळें त्यांची भिक्षुकीहि चांगली चाले. गणपती, सत्यनारायण, वटपौर्णिमा असं कांहीं असलं म्हणजे अण्णा मला पूजा सांगायला पिटाळायचे. मी पण अशावेळीं उड्या मारीत जात असें. थोडीफार ' खाजगी ' कमाई होई, ती लंगोटींत दडवून ठेवून घरीं आणायची न् जत्रमारख्या दिवसाकरितां सांभाळून ठेवा-यची! हल्लींच्या अत्यावश्यक गरजा माझ्या लहानपणीं चैनीच्या सदरांत जमा होत असत. थंडीचा कितीहि कडाका असो, एका कुडत्याशिवाय अंगांत कांहीं घातलं नाहीं—म्हणजे दुसरं काहीं नव्हतंच! हें कुडतं म्हणजे एक सैलसा डगला होता. चार वर्षं माझ्या वाढत्या अंगाला दाद देणार नाहीं, इतका तो सैल होता. दोन वर्षांनीं फाटला तेव्हां अण्णानीं मला दम भरला—

" शिंचो, अंगाला कांटे आहेत कीं मांस आहे ? "

हातघाईवर न येतां अण्णांनीं नुसतं शब्दाच्या मारावर भागवलं, म्हणजे तें मोठ भाग्याचं वाटे! झिज्या न् खेंकसण एवढं अंगवळणीं पडलं

होतं की 'पाणी', 'दूध' असल्या सामान्य नामांसारखंच तें कानावरून पलीकडे जाई. केवढीहि थंडी असली तरी त्याबद्दल अण्णांजवळ तक्रार करायला तोंड नव्हतं. कसं सांगणार ? गांवकीसारखा प्रसंग सोडला, तर अण्णांच्या अंगाला दोपरपंचा न् डोक्याची टापशी, याच्याशिवाय कशाचा स्पर्श होत नसे. गांवांत सगळीकडे ते याच 'ड्रेसांत' हिंडत. भर थंडींत कुडतं तर नाहींच, पण पांघरायला सुद्धां, त्यांचं वर्षानुवर्षं वापरलेलं उपरणं सोडलं, तर दुसरं कांहीं नसे. तेव्हां थंडी कितीहि असली तरी अशा स्थितींत आम्हाला लागावी कशी ? रात्री मी, विन्या, काशी नी बन्या गुरगुटी करून झोंपत असूं. जरा वेळानं चांगली ऊब यायची. हाच आमचा स्वेटर न् रग ! सकाळीं गवाणींतील गवत न् आगरांतील झांप यांची शेकोटी करून आम्ही बसत असूं. हातणीशी अण्णा स्नान आटोपून धोतर धूत असायचे. तोंडानं पुरुषसूक्त चालूं असायचं. आपल्याच व्यवसायात ते दंग आहेत, असं दिसलं तरी त्यांची फार काळजी घ्यावी लागे. अण्णांच्या दृष्टीआड शेकोटीं सदा राहील अशा जागेवर आम्ही बैठक ठोकीत असूं. तरीसुद्धा त्यांच्या नजरेंतून कांहीं सुटत नसे.

"शिंचो, तें झांप द्रोणींत टाकायचें सोडून शेंकोटी करतांय ? न् रघ्या कुठलं आणलंस तें गवत ? काय म्हणतांयस ? गवाणींतलं ? उडवीतलं दिसतांय. चल टाक नेऊन म्हैशीपुढं."

काय छातीं होती रघ्याची शेकोटीशीं रेंगाळण्याची !

"मी आणलं नाहीं--विन्यानं आणलं—" असं कांहींतरी अण्णांना ऐकूं न येईल इतक्या हळूं पुटपुटत तेथून सुंबाल्या करायचा. थंडी कुठची राहाणार या धकाधकींत ? जिवावरचं शेंपटीवर निभावलं, या आनंदांत आंघोळीला जायचं. भल्या सकाळीं शाळेंत जाणं या दिवसांत एक दिव्य असे. पायताण नसायचं. सपासप खडे बोंचत, न् कळ मस्तकांत जाई. त्यांतच ठेंच लागावी ! घर सोडलं कीं मी थांबायला सुरवात करायचों. बापू जोशाचं हाटेल घरापासून पंधरा मिनिटांच्या अंतरावर आहे. तेथें येईतों

थंडी पार पळून गेलेली असायची. ऊन, थंडी, पाऊस या घटकेपर्यंत मला कधीं बाधलेलीं नाहींत. कारण यापैकीं कुणाचेच चोंचले मला पुरवतां आले नाहींत. पावसाळ्यांत छत्री वापरणं रोजगारी होईपर्यंत मला ठाऊक नव्हतं. इरलं घेऊन मी शाळेंत जात असे. लहानपणीं अनुभवलेल्या या रांकट परिस्थितीचा परिणाम माझ्या मानसिक कोशावर फार झालेला आहे. अण्णा हिशेबी होते. किती ! कुटुंबाला वार्षिक तांदूळ किती लागतात, हें त्यांना कुणी सांगितलं तर बाकीचे सारे पदार्थ मीठ, मिरची, तेल, सारं किती लागलं पाहिजे तें ते अचूक सांगत.

" दोन मण तांदूळ खातांना दोन पायलीपेक्षा जास्त मीठ खाल्लंत, तर सारं मीठ तुम्हीं खात नाहीं—काहींची नासाडी करतां. "

अण्णा चक्क सांगायचे न् त्यांचे हिशेब बरोबर असत.

आमचे अण्णा असे होते तरी आम्हीं त्यांच्यावर कधीं चिडत नव्हतों. त्याकाळीं लहान मुलांनीं घसक्–फसक् करून घेण, ही रीतच होती ! मी ट्रेनिंग कॉलेजांत गेल्यावर मानसशास्त्राच्या मदतीनं या वागणुकीचं विश्लेषण करूं लागलों. आमच्या छोटूच्या दृष्टीनं हें दुर्दैवाचं ठरलं! छोटूशीं मी 'शास्त्रीय' पद्धतीनं वागू लागलों न् त्याला नाजुक मात्र करून ठेवलं आहे. मधून मधून सणसणीत थोबाडून घेण्याची संवय मुलाला असणं वाईट नाहीं. प्रकृति निकोप राहाते, मनाचं पंगुत्व नष्ट होतं, असं आपलं माझं ' गांवठी ' मत बनत चाललं आहे ! गेल्या काळाला वाटेल तीं नांवं ठेवा—रांकट शरीर न् तितकंच रांकट मन या त्या काळच्या अमोल देणग्या होत्या. व्हिटॅमिन्स आणि मानसशास्त्रीय वागणूक यांच्या फाजील खुराकावर वाढलेली हल्लींची पिढी पाहिली कीं हंसायचं कीं रडायचं तेंच कळत नाहीं ! तात्पर्य काय, त्याकाळची रीतच घसक्, फसक् करून घ्यायची होती. शिवाय आमच्या कुटुंबाचा पसाराच तसा मोठा—अण्णा, आई, काशीत्या, सुंदरात्या, आम्हीं चार भावंडं एवढ्या आठ माणसांचं कुटुंब अनृणी राहून अण्णांना चालवायचं होतं. त्यांनी तें व्रत जन्मभर चालवलं.

* * *

: २ :

गतायुष्याकडे नजर टाकली म्हणजे मला कशाचं आश्चर्य वाटत असेल तर माझ्या आनंदी वृत्तीचं. आपल्या आयुष्यांत कांहीं उणीव आहे, कसली रुखरुख मनाला लागली आहे, असं कधीं झालं नाहीं. माझ्या शालेय जीवनांत मी जेवढा मार खाल्ला आहे, तेवढा क्वचितच् कुणीं खाल्ला असेल. पांचवींत आल्यावर तर याचा कळस झाला पोंक्षे मास्तर मारकुट म्हणून आम्हीं ऐकत होतों, ––आतां तें प्रत्यक्ष अनुभवायची वेळ आली विद्यार्थी म्हणून माझ्याजवळ कोणतीच कमाई नव्हती कीं ज्यामुळें पंतोजींनीं मला प्रेमानं वागवावं. पोंक्षे मास्तरांनीं वर्गांतल्या मुलांचे अ–ब–क–ड वगैरे जे वर्ग पाडले होते, त्यांत मी 'ड' वर्गांत मोडत होतों. मी कसा होतों ? 'ड' वर्गांतला विद्यार्थी जसा असायला पाहिजे तसाच होतों. पंतोजी शिकवीत असतील, त्यापैकीं कशाकडेही लक्ष नसण, चाहेल त्यांची वर्गांत खोडी काढणं, आणि थोडासा प्रतिकार झाला तरी त्याचं सहर्ष स्वागत करून मारामारीला उभं ठाकणं, पंतोजींना कोणत्या प्रसंगीं कोणती थाप मारली असतां बांक्या प्रसंगांतून सहीसलामत सुटका होईल, या संबंधीच्या विचारांत दंग असणं, वगैरे सर्व गुण प्रकर्षानं माझ्या अंगांत वसत होते. भरीला मी पडलों तगडा मुलगा. वर्गांतल्या कोणत्याहि चार मुलांनीं एकत्र हल्ला केला, तरी त्यांना मी भारी पडत असें. माझ्या अत्यंत आवडीच्या विषयापैकीं मारामारी हा एक होता. आतां मी एवढा शिकलों सवरलों आहें, शिक्षकाचा पेशा आहे, पण लहानपणच माझ्या ठायीं वसत असलेलं तें मारा

मारीचं अंग कांहीं कमी झालेलं नाहीं. नमुनाच पहायचा असेल तर देवीच्या यात्रेंत मला पहावं.

चैत्र शुद्ध प्रतिपदेपासून नवमीपर्यंत नऊ दिवस देवीचा उत्सव चालतो. नवव्या दिवशीं पहांटे जेव्हां रथ उचलतात आणि रेटारेटी सुरू होते त्यावेळीं जना 'रघ्या' अजूनहि सर्वांना पहायला मिळतो.

आमच्या या उत्सवाला 'देवीची यात्रा' हें नांव कसं न् केव्हां रूढ झालं, माहीत नाहीं. या नऊ दिवसांत दुर्गादेवीच्या विस्तीर्ण पटांगणांत मोठी जत्रा भरते, यावरून कदाचित् हें नांव पडलं असाव. महापुरुषानं साखरपेंडीची स्थापना केली तेव्हांपासून हा उत्सव होत आलेला आहे दुर्गादेवीची मान उजव्या बाजूला किंचित् कललेली आहे. त्यासंबंधीं एक दंतकथाहि रूढ आहे. साखरपेंडीची स्थापना झाल्यावर लगेच कांहीं दिवसांनीं मोंगल लोकांची टोळधाड गांवावर आली. त्या कठीण प्रसंगीं महापुरुषाच्या खांद्याला खांदा लावून दुर्गादेवीनं साखरपेंडीचं संरक्षण केलं. माडाच्या पातीच शस्त्र धारण करून तिनं रिपुदमन केलं. या समरप्रसंगीं तिच्या मानेवर वार होऊन मान उजव्या बाजूला कलली गेली! ही दंतकथा आम्हां मुलांमध्यें फार प्रसिद्ध मोठ्या माणसांनीं विश्वास ठेवण्यासारखं यांत अर्थातच कांहीं नाहीं. प्रत्येक साखरपेंडीकराचं दुर्गादेवी हे अत्यंत प्रिय दैवत आहे. दर वर्षीं उत्सवात पुण्या-मुंबई-कडची मंडळी देवीची खणानारळानं ओटी भरायला येतात. कोणी साडी, कोणी नथ, कुडी, कोणी पाटल्या-जो तो आपल्या ऐपतीप्रमाणे कांहीं तरी अर्पण करीत असतो. हें सारं नवसापायींच असतं, असंहि नाहीं. देवीच्या पायाशीं आपली कांहीं तरी सेवा रुजु व्हावी, हीच मोठी इच्छा. साखरपेंडीची पुण्या-मुंबईकडची सारी रोजगारी मंडळी दर वर्षीं न चुकतां यात्रेला येतात. कोणी 'शीक' रपोट देतो, कोणी तार मागवतो, कोणी नुसतीच दांडी मारतो, पण कोणताहि गांवचाला या नऊ दिवसात गावीं आल्याशिवाय स्वास राहात नाहीं. अगदीं कांहीं नाहीं, तर निदान पहांटेचा रथ चुकू नये

या करतां सर्वांची धडपड चालू असते. हल्लींच्या अराजक युगांत श्रद्धेचे जुने विषय मागं पडले न् त्यांची जागा अजून भरून निघायची आहे. अशा या युगांत नास्तिकालासुद्धां हेवा वाटावा असा सोहळा यात्रेच्या नऊ दिवसांत आमच्याकडे असतो. साखरपेंडीला कांहीं वल्ली अशा आहेत–जरा कांहीं निघालं कीं देवाशीं येऊन ठेपतात न् त्याच्या अस्तित्वाचा पुरावा मागूं लागतात. देव म्हणजे लाडू–चिवडयासारखं कांहीं नव्हे तर त्याचा पुरावा त्याच्या घशांत कोंबायचा! पण हेच लोक चैत्री यात्रा मात्र कधीं टाळीत नाहींत! साखरपेंडीवरच्या त्यांच्या प्रेमाचं हें केवळ प्रतीक असावं. कांहीं असो, या नऊ दिवसांत साखरपेंडी फुलून जाते, एवढं खरं. सबंध वर्षांत ज्यांचे चेहरे पहायला मिळायचे नाहींत, ते पावसाळी छत्रीसारखे गांवांत एकदम उगवतात.

"शिरप्या–रांडूच्या किती उंच झालास एका वर्षांत!" असले उद्‍गार ऐकण्याची पाळी कित्येकांवर येते.

साखरपेंडीचे गांवकरी देवीच्या यात्रेविषयीं एवढे दक्ष असतात, यांत फारसं नवल नाहीं. देवीच्या यात्रेचा महिमाच तसा आहे. आमच्या तेथल्या वीस मैलांच्या बंदरपट्टयांत वरपेंडी, धोपडपेंडी, गूळपेंडी न् साखरपेंडी या चार ठिकाणीं दुर्गादेवीचं वास्तव्य आहे; न् या चार देवस्थानाचे घनिष्ट संबंध ग्रामस्थापनेपासूनचे आहेत. प्रत्येक गावाला बाकीच्या तीन गांवांतल्या देवीच्या उत्सवांत मानाची नारळाची जोडी असते. हा मान देण्यांत नुसती क्रमांकानं जरी चूक झाली, तरी वादळ निर्माण होतं. तें शमवायला चारी गांवांची गांवकी भरवायची वेळ येते न् गांवकींतून इतर कांहीं निष्पन्न झालं नाहीं तर मारामारी खास बाहेर पडते! या करितांच हें काम नव्या माणसाकडे कधीहि सोपविलं जात नाहीं. चारी गांवांचा संस्थापक एकच महापुरुष होता, अशी आख्यायिका आहे. महापुरुषानं अंतकालीं सावित्रीच्या डोहांत समाधि घेतली न् तिथंच तो आतां कायमचं वास्तव्य करून आहे. साऱ्या भाविकांचा हा विश्वास आहे. यामुळं या ग्रामचतुष्टांत साखरपेंडीचं

माहात्म्य तीर्थक्षेत्रासारखं होऊन बसलं आहे. ही आख्यायिका खरी असावी. कारण चारी गावांतले उत्सव अगदीं एका नमुन्याचे आहेत.

महापुरुषाच्या धोरणी दृष्टीचे अनेक प्रकार आम्हांला आजहि पाह्यला मिळतात. उत्सवांतली नुसती मानाची गोष्ट घ्या—जरा बारकाईनं पाहिलं कीं कौतुक वाटतं या साऱ्या प्रकाराचं. उत्सवाचा मंडप घालण्याचा मान कुणबी मंडळींचा आहे. महादू बटावळ्यासारखा दारुड्या सुद्धां शुचिर्भूत स्थितींत मंडप उभारायला येतो! मंडपाचं छत बांधायचा मान परटाकडे. देवीचे दागिने चकचकीत करण्याचा मान सोनार मंडळीचा. बाहेरच्या माणसानं देवीच्या मुकुटाला सोनेरी मुलामा करून देतों म्हटलं तरी चालायचं नाहीं. वेडंवाकडं कसं कां होईना—साखरपेंडीच्या सोनाराकडूनच हें काम झालं पाहिजे. उत्सवाच्या नऊ दिवसांत पहारा करण्याचा मान कोळीवाड्याकडे आहे. काश्या कोळी या नऊ दिवसांत नुसता नाचत असतो. या साऱ्यावर कळस म्हणजे उत्सवाच्या दिवसांत देवळात लागणारं तेल पुरवण्याचा मान अबदुलमियां तेल्याकडे आहे. हा मान त्याच्या घरांत पिढ्यान् पिढ्या चालत आलेला आहे. या सर्व मानांचा राजा ' सरमान ' हा नवव्या दिवशीं पहाटें रथ उचलायच्या अगोदर दिला जातो. सगळ्या मानकऱ्यांत ज्याचं काम उत्कृष्ट झालं असेल, त्याला दुर्गादेवीच्या पाया लगतची नारळाची जोडी खास मान म्हणून देण्यांत येते. या मानाच्या निर्णयाबद्दल पुढं मतभेद होऊन मारामारीपर्यंत प्रकरण येऊं लागलं—त्यामुळ आतां हा मान आळीपाळीनं सर्वांना देण्यांत येतो. केवढं धोरण महापुरुषाचं! आम्ही त्याला हरताळ फासला, ही गोष्ट वेगळी. व्यक्तीचा मानबिंदू जागृत करून सबंध गांवाचं ऐक्य साधणारा हा पुरुष किती थोर न् धोरणी असला पाहिजे! प्रत्येक जमात आपल्या मानाला प्रसंगीं रक्ताचं मोल देऊन जपते. कांहीं वेळां या मानांतून अक्षरशः मारामारीचे प्रसंग उद्भवतात. अर्थात असे प्रसंग क्वचितच. पुजारी लोकांकडे हें उत्सवाचं काम असतं न् पिढ्या न् पिढ्या तें ते करीत आलेले आहेत.

त्यामुळं असली चूक सहसा होत नाहीं. झालीच, तर अशा प्रसंगीं तोंडी माफीपासून साष्टांग नमस्कारापर्यंत वाटेल ते करायला पुजारी मंडळी तयार असतात.

रथाच्या भाईवरून ब्राह्मणमंडळींत होणारी मारामारी मात्र पुजारी लोकांना कधींच थांबवतां आली नाहीं. रथाच्या चार भाईना चार गांवांचे मान असतात. घोपडपेंडी--साखरपेंडी मागच्या भाईला न् गूळपेंडी, वरपेंडी पुढच्या भाईला -ही रथाची खेंचाखेंच आमच्या पट्टयात फार प्रसिद्ध आहे. चारी गांवचे तगडे तरुण हिरीरीनं 'रथाला' हजर असतात. रातोरात दहा दहा मैल अंतर तुडवून धापा टाकीत रथ उचलायच्या वेळेला हजर राहणारे वेडे तरुण पहायला मिळतात. आपल्या शक्तीचा कस लावायला दोन्ही बाजूकडची तरुण मंडळी दंड ठोकून उभी रहातात. रात्रीपासून गप्पा उठायला सुरवात होते--

"यंदा गूळपेंडीची मंडळी जोरांत आहे. सद्या वर्तक न् धोंड्या मेहेंदळा मुद्दाम आले आहेत मुंबईहून !"

सद्या न् धोंड्या खरोखरच रीस होते.

पहाटे साडेपांचाला रथ उचलायची वेळ झाली म्हणजे तिथल्या अफाट जनसमुदायात उत्साहाची पौर्णिमा निर्माण होते.

— कथा अजून संपायची आहे. पण ते पाहा एकेक जवान मंडप सोडून चालले. देवीच्या तळ्याशीं गूळपेंडीचे जवान एकत्र जमले आहेत. घोटा घेतल्यामुळें कांहींचे डोळे तांबूस दिसत आहेत. डोक्याला घट्ट टापशी न् कपाळाला गुलाल फांसलेला, अशा थाटांत ते सज्ज झाले आहेत.

कथा संपली ! चौघडा सुरू झाला. सनईतून भैरवीचे गोड सूर बाहेर पडत आहेत. बाहेर सारी मंडळी "भाई, भाई" हा एकच बुभू:-कार करीत आहेत. चला, जरा पुढं चला. तळ्याजवळच्या चौथऱ्याकडे चला. जरतारी वस्त्रांनीं शृंगारलेला तो रथ पाहा. किटसन् लाईटच्या

प्रकाशांत त्याचा कळस लकाकत आहे. रथाच्या भाईना चारी गांवचे जवान उभे आहेत. चारी गावची शक्ती आज इथं एकत्रित झाली आहे.

पुजारी आला! तो पाहा रथावर चढला, चाफ्याची फुलं तो लोकांवर उधळतो आहे. आरती सुरु झाली !

" दुर्गे दुर्गट भारी तुजविण संसारीं—अनाथ नाथे अंबे करुणा विस्तारी ......वारी वारी जन्म...... "

सहस्र मुखांतून देवीची आरती बाहेर पडत आहे. आरती संपली !

"जगदं ब!" पाहातां काय? तो पाहा ! दुर्गामातेचा रथ शेंकडों समर्थ खांद्यावर झुलत आहे. फार हलतोय् रथ. पुजारी आपलं स्थान मोठ्या मुष्किलीनं टिकवून आहे. विलक्षण रेटारेट चालू आहे. रथ जागच्या जागीं उभा आहे ! पाच मिनिटं झालीं !

" भाई–भाई ! " एकच ध्वनि तेथल्या असंख्य मुखांतून बाहेर पडत आहे. रथ हलला ! चालला !! पुढं चालला ! शाबास साखरपेंडी ! आतां साखरपेंडी ऐकत नाहीं. रथ सारखा पुढं चालला आहे. मारुतीचं देऊळ आतां फक्त पंचवीस पावलं आहे. रथ तिथं गेला कीं संपलं—

पण आतां सामना संपलेला दिसतो. प्रकरण चिडणार ! गूळगेडीचे लोक मारुतीचं देऊळ सोडून डाव्या बाजूला वळत आहेत. नियमाचा हा भंग आहे. साखरपेंडीच्या बच्याकडून कुजबुज चालू आहे.

मारामारी ! होय, मारामारी ! सद्या वर्तकनं रघुदादांच्या कानशिलांत भडकवली ! रघुदादांच्या कानशिलात ? साखरपेंडीचा हा अपमान आहे.

सोडली ! रघुदादानीं भाई सोडली ! ते पाहा–त्यांचा आवेश पाहा. आतां दाखवा आवरून या वाघाला. सद्याला रघुदादांनीं खालीं घातलं !

न् दुसऱ्या दिवशीं सारी साखरपेंडी रघुदादांचे पराक्रम वर्णन करीत असायची ! साखरपेंडीच्या सामर्थ्याचं, निधडेपणाचं प्रतीक म्हणून माझ्याकडे आज मितीला बोट दाखविलं जातं.

यात्रेचं वर्णन लांबलं किती पहा; पण हा विषयच असा आहे—एकदां निघाला कीं आम्हीं बेहोष होतों. सांगायचं तात्पर्य काय, लहानपणापासून मी फार तगडा मुलगा. पण कितीहि आडदांड झालों तरी पंतोजीपुढं काय चालणार ? अभ्यासाची सदा वाताहात, त्यामुळं फटके खाणं अंगवळणीं पडलं होतं. पण फटके खातांनासुद्धां माझी दृष्टी सर्व मुलांवर कावळ्या-सारखी असे. माझ्यासारख्या मुर्दाड पोराला फटके परस्पर पोंचते झाले, तर कोणाला नको होते ? पंतोजींकडून होत असलेली माझी शोभा पाहून बहुतेक पोरं निहायत खूष असायचीं. पण अशा प्रसगीं जर का कोणाच्या तोंडावर आनंदाचं हास्य दिसलं तर,—तर काय ? कोणाची छातीच नव्हती हंसण्याची. पोरं खूष व्हायचीं ' रघ्याला ' शिक्षा झाली म्हणजे. पण माझी धिंड चालू असतांना सारा वर्ग लटके आंबट चेहरे करून असायचा.

अशीच एक वेळ-सोमवार होता तो. सोमवार माझा नेहमींचाच घात-वार. आणि तशांत दादूमियाच्या जत्रेनंतरचा तो दिवस होता. सारा शनिवार–रविवार जत्रेंत घालविला होता. पोंक्षे मास्तरांनीं अभ्यास सपाटून दिला होता, न् त्यांतलं अक्षरहि मी केलं नव्हतं. शाळेंत गेलों. अभ्यास न करणारीं कुळं मास्तरांना ठाऊक होतीं. ठराविक दाणे ते उचलीत. डावा कान उजव्या हातानं धरून दर शब्दाला पीळ भरीत ते सुरवात करायचे,—

" बोल—अभ्यास कां झाला नाहीं ? पुस्ती दाखव–गणित दाखव–हें दाखव–तें दाखव......"

या दाखवादाखवीच्या धकाधकींत शेवटीं चौदावं रत्न बघण्याची वेळ येई ! आणि पोंक्षे मास्तर ते ! पोराना बडवायची संधी मिळाली, म्हणजे त्यांच्या तोंडाला नुसतं पाणी सुटे. माझ्या सारखं कूळ भेटल्यावर तर पहायलाच नको. मुंबईच्या रस्त्यावर लोक खिसेकापूला पकडतात न् मग फटके कुठं, किती, कसे न् कुणी मारावेत, याला धरबंध नसतो.

कोणीही यावं-न् ठोसा मारून चालूं लागावं ! [illegible] जवळ जवळ तसंच होई. प्रकृतीनं आडदांड, त्यामुळं पोंक्षे मास्तरांचा कोणताहि ठोसा फारसा गाजावाजा न होतां पावता करून घेण्याचं सामर्थ्य शरीरांत होतं. मग काय ?--पोंक्षे मास्तर मारताहेत न् आम्हीं मार खाताहोत !—तर तो सोमवार होता. पोंक्ष्यांना माहित होतं, रघ्या बेंद्रेचा अभ्यास—आज पूज्य असणार. वर्ग सुरुं झाल्याबरोबर त्यांनी आमच्यावर हल्ला सुरूं केला, पण मी सुद्धां आज निश्चय केला होता—वाटेल ती थाप मारायची पण मार खायचा नाहीं. रविवारीं रात्रीं अंथरुणांत पडल्या पडल्या मला पोंक्षे मास्तर दिसत होते. वास्तविक झोंपेचं न् माझं एवढं सख्य होतं—पांच मिनिटांवर मला कधीं तिची आराधना करावी लागली नाहीं; न् एकदां तिच्या स्वाधीन जीव केला कीं सहा वाजेपर्यंत मी नी मुडदा एकाच किंमतीचे असतों. पण आज कांहीं केल्या झोप येईना. उद्यां काय केलं, म्हणजे पोंक्षे मास्तरांच्या तावडींतून सुटका होईल याच एका गोष्टीचा विचार मी करीत होतों. पुष्कळ कल्पना सुचत पण त्या बहुतेक वापरलेल्या होत्या ! कोणतीच कल्पना रुचेना न् झोंप कांहीं येईना. शेवटीं सुचली एकदांची थाप. नामी होती ! अजब होती ! माझ्या कल्पनाशक्तीचं कौतुक करीत झोपी गेलों. दुसरा दिवस उजाडला. नित्याप्रमाणें वर्गांत गेलों. महाद्या, सद्या, गण्या सारे अभ्यास करून गेले होते. मी पण निष्काळजी होतों. प्रार्थना संपली. वर्ग सुरू झाला.

"बेंद्रे !" आवाज कठोर पण परिचयाचा होता. वर्गांत कोणालाच त्याचं कांहीं वाटलं नाहीं. मला वाटायचं; पण मी रडका, तिकोनी चेहरा करून उभा राहिलों.

"शुद्धलेखन पाहूं दे, बेंद्रे—"

"काढलं नाहीं मास्तर--मी कांहींच अभ्यास केला नाहीं."

"कधीं केला आहेस तर आज सांगायचं आहे समारंभानं ?"

"करणार होतों ......"

" मग कुठं घोडं [redacted] ? "

मी मुसमुसून रडूं लागलों! वळवळणारी पोंक्ष्यांची छडी मागें झाली. आवाज खालीं आला. जागा सुटली. पोंक्षे चालूं लागले. अगदीं माझ्याजवळ आले. ज्या हातानं माझ्या शरीरावर छडीचे फटके पडायचे, तोच हात माझ्या पाठीवर आला.

" काय झालं बेंद्रे ? " गोड आवाजांत पोंक्ष्यांनीं मला विचारलं.

" माझी आत्या वारली मास्तर ! " न् मी पुन्हां रडूं लागलों. माझ्या रडण्याचा मास्तरांवर काय परिणाम होतो आहे, तें मी चोरून पाहात होतों पहिलं पाऊल बरोबर पडलं होतं; पण पुन्हां मी जें भोकाड पसरलं, तें बहुधा जरूरीपेक्षां अधिक झालं असावं ! पोंक्षे थोडेफार संशयग्रस्त झाले. साखरपेडी शहरवजा गाव झाल, तरी ब्राह्मणवाडींतलं मर्तिक त्यांना न कळणं जरा चमत्कारिकच होतं. त्यांना बातमी विश्वास ठेवण्यालायक वाटेना—पण पोरग तर चांगलं रडतंय ! मी कांहीं फारसा अब्रुदार विद्यार्थी नव्हतों या बातमी-वर विश्वास ठेवण्याअगोदर पोंक्ष्यांनीं उलट तपासणीला सुरवात केली.

" काय झालं तुझ्या आत्याला ! "

" तापानं मेली. "

" केव्हां—— ? "

" काल. "

" काल म्हणजे केव्हां ? सकाळीं ? दुपारीं ? संध्याकाळीं ? " मास्तराचा आवाज चढत होता. मला स्पष्ट दिसत होत—त्याची पहिली सहानुभूती आतां राहिली नव्हती. ते पुन्हा चढ्या आवाजांत बोलू लागले होते

" सकाळीं—" मी उत्तर दिल.

आमची मर्तिकं मुसलमान न् कोळीवाडा याच्या मधून—मसण बिर्दीतून जातात. आणि निम्म्यापेक्षां अधिक मुलं मुसलमान—कोळी होती. पोंक्ष्यानीं मुलांना एकदम प्रश्न केला—

" मुलानों, काल मसणबिर्दीतून ब्राह्मणाचं मर्तिक गेलं होतं कां ? "

" मास्तर, मर्तिकच गेलं नाहीं काल!" सारीं पोरं एकदम ओरडलीं. मी रडण्याच्या ॲक्टिंगमध्यें दंग होतों–त्यामुळं गुद्दे दाखवून पोरांना दमहि देतां येईना. मी मनांत म्हटलं होतं—

" मेलेली आत्या, पुन्हां एकवार तिला मारलं म्हणून काय बिघडतंय?"

माझी ही तटबंदी जवळ जवळ एकाच घावांत ढांसळली होती. माझा तिकोनी, रडका चेहरा तसाच ठेवून पुढं काय काय होतं, तें पाहण्या-पलीकडे गत्यंतर नव्हतं. माझ्या घाताला कारण झालेल्या त्या पोरांत एकच अपवाद होता–– कादर अबदुलमियां तेली.

आजवर माझ्या लक्षांत कधीं न आलेला विद्यार्थी होता तो. वास्तविक कादर न् मी बिगरपासून एका वर्गांत होतों. कादर फार तीक्ष्ण बुद्धीचा, पोंक्षे मास्तरांचा सर्वांत आवडता विद्यार्थी होता. नमुनेदार मोडी बाळबोध अक्षरं मी पुष्कळ पाहिलीं आहेत. खुद्द माझी दोन्हीं अक्षरं चांगलीं आहेत. पण कादरचं अक्षर म्हणजे किस्सा होता. अक्षराचा डौल न् वळण–– पोंक्षे मास्तर डोक्यावर घेऊन नाचायचे त्याच्या अक्षराला. न् तें अगदीं योग्य होतं. हुषार, मास्तरांचा आवडता विद्यार्थी म्हटलं म्हणजे साहाजिकच इतर विद्यार्थ्यांना हा विद्यार्थी आपला दोस्त असावा असं वाटतं. कादर-बद्दल अशा तऱ्हेची भावना मला कधींच वाटली नाहीं. लहानपणापासून मी मानी. " असेल कादर हुषार–मला काय त्याचं?" ही माझी वृत्ती होती. शिवाय तो 'अ' वर्गीय–मी 'ढ' वर्गीय. माझ्या विरुद्ध उभा राहात असलेला पुरावा कादर बसून राहिल्यामुळं बारगळत होता. माझ्या विरुद्ध चालविलेली तपासणी पोंक्षे मास्तरांनीं तशीच टाकली. " आत्या मेली" या गोष्टीवर त्यांचा विश्वास बसत नव्हता. पण मरणाच्या बातमी-वर त्यांना अधिक चिकित्सा नको असावी. त्यांनीं एक चिट्टी खरडली आणि अण्णांना देण्याकरितां कादरजवळ दिली. मधल्या सुट्टींत त्यांनीं कादराला आमच्याकडे पाठवलं सुद्धां!

कादरनं चिठ्ठी घेतली. त्याला काय वाटलं न कळे—त्यानं असं कांहीं तोंड केलं. कोणाच्याहि अध्यांत मध्यांत न पडणारा तो होता. त्यानं थट्टा-मस्करी केली तरी माफक—हंसला तरी माफक. एक अभ्यास सोडला तर सारंच माफक! असलं हें अळणी आयुष्य या प्राण्याला कसं काय आवडतं! मला नेहमी वाटे. पण या बांक्या क्षणाला हे सारे विचार मागं पडले. आशाळभुतासारखा त्याच्या हालचालीकडे मी पहात होतों. मोठ्या कष्टानें तो उठला. घोंगटी गळ्यांत अडकवून शाळेबाहेर पडला. यापूर्वी कादर माझ्या गांवींहि नव्हता. तो पहिल्या नंबरला तर मी शेवटच्या दोन तीन मुलांत कुठं तरी. कादर अत्यंत शांत—मी एक नंबरचा टवाळखोर. पोक्ष्यांची पाठ वळताच त्यांना वेडावण्याकरिता एकादी वेडीवाकडी उडी मी मारली नाहीं, तर रध्या बेंद्रा कसला! कादर मुसलमान न शोभण्याइतका मवाळ होता; मी ' हिंदु ' न शोभण्याइतका पुंड होतों! अनेक दृष्टीनं विषम जगांत वावरणारे आम्हीं दोन जीव—भवितव्यतेंत कांहींहि असलं, तरी त्या दिवसा-पर्यंत तरी त्याचा माझा तोंडओळखीपेक्षा अधिक संबंध नव्हता. नाहीं म्हणायला प्रार्थनेच्या वेळीं कादर इतर मुसलमान पोरांप्रमाणें हात जोडीत नसे, हें मी पाहिलं होतं. पण त्याची चिकित्सा माझ्याकडून होण्याचं कारण नव्हतं. भर प्रार्थनेंत शेजारच्या मुलाला पायानं ढंवसणारा प्राणी मी! प्रार्थनेच्या वेळीं निश्चल उभा नाहीं, म्हणून फटके सुद्धा खाल्ले होते पोक्ष्यां-कडून. तेव्हां असली वल्ली दुसरा हात कां जोडीत नाहीं याची चिकित्सा ती काय करणार. एकूण काय, यापूर्वी कादरचा—माझा संबंध आला नव्हता.

न् आला तो या परिस्थितींत! एवढा मानी मनाचा मी; पण आजच्या अजोड परिस्थितींत साफ नरम पडलों होतों. आजवरच्या आयु-ष्यांत बेदरकारपणें वागत आलों. वेळेस वाटेल तेवढा मार खात होतों, पण भीति, काळजी यांनीं माझ्या जीवनांत आजवर प्रवेश केला नव्हता.

आज तो दिवस उजाडला होता. या बिकट परिस्थितींत काय करणं शक्य आहे, याचा विचार करीत होतों.

तो सारा दिवस वर्गांत कसा गेला, मला कळलं नाहीं. मधली सुटी झाली. शाळेच्या पिछाडीला पिऱ्याचा डोंगर. तेथल्या एका झाडावर सारी दुपारची रजा काढली. दुपारची रजा शांततेंत घालवली, असा माझ्या आयुष्यांत तो पहिलाच दिवस असावा. कादरजवळ दिलेल्या चिठ्ठींत काय असेल ? अण्णांना ही चिठी मिळाल्यावर ? अण्णांची ती उग्र मूर्ति माझ्या-समोर उभी राहिली न् थरकांप झाला माझा. अण्णा मारायला फारसे निघत नसत. पण एकदां कां सुरवात झाली कीं पोंक्षे मास्तरांचे चार एकत्र मार अण्णांच्या माराचा केवळ ' म. सा. वि. ' ठरता.

आंब्याच्या ढोलींत बसून माझे विचार चालू होते. माझा हात भुंवईकडे गेला. भुंवईवरची ती खोक आतां जन्माची धन होऊन बसली आहे. गेल्या वर्षी पुरुषसूक्ताची संथा अण्णांकडून आम्हीं घेत होतों. एका स्वरांत माझ्या-कडून सारखी चूक होत होती. अण्णांनीं दोनदा ऐकून घेतलं---समजावून दिलं. शेवटी खवळले. दशग्रंथी ब्राह्मणाच्या पोराची ती चूक त्यांच्या दृष्टीनं सर्वथैव अक्षम्य होती. अण्णा हडप्याशीं बसले होते. पाणी पिण्याची पचपात्री हातीं लागली ती एवढ्या तडाख्यानं त्यांनीं माझ्याकडे फेकून मारली–माझ्या बाजूला संथा घेणारे किश्या नी परांजप्यांचा बग्या ताडकन् उड्या मारून बाहेर पडले. माझ्या भुंवईला खोंक केव्हां पडली न् लालभडक रक्त केव्हां ओसंडून वाहूं लागलं, मला कळलं नाहीं. पोटावरून खालीं उष्ण रक्ताचे ओघळ सांडत होते. तें दृश्य भयानक होतं. मी स्वतः मला किती लागलंय यापेक्षा आणखी किती लागणार याच चिंतेंत होतों. विन्यानं ओलं फडकं रक्त पुसायला आणून दिलं.

" शिंचो ! बाजूला व्हा ! " अण्णा कडाडले. वावटळींत सांपडलेलं कोंकरूं मिळेल त्याचा आधार घेतं. विन्यानं ओटीवर उडी मारली. लेकरानं आईला बिलगावं, त्याप्रमाणें त्यानं खांबाचा आधार घेतला. भेदरलेल्या

नजरेनं तो अण्णांकडे पाहात होता. रघूला आणखी मार बसणार अशी त्याला सारखी भीति वाटत होती. ती भीति त्याच्या डोळ्यांतून मूर्तिमंत ओसंडत होती. टकमक-टकमक करणारे त्यांचे ते इवलाले डोळे—

मी आंब्याच्या ढोलींत आहें, याचा मला क्षणभर विसर पडला. खालीं पटांगणांत हसन–अबदुल्ला गुद्दागुद्दीवर आले होते. इतर कोणत्याहि वेळीं या गुद्दागुद्दींत मी सामील झालों असतों. संबंध असो वा नसो–गुद्दागुद्दी, मारामारी हे प्रांतच खास माझे होते. किमान मारामारी मिटवण्याच्या मिषानं तरी असल्या धमालींत माझा प्रवेश व्हायलाच पाहिजे. आज मला हें गोड दृश्य दिसत होतं न् नव्हतंहि. हसन-अबदुल्ला यांच्याकडे एक॰ वार मी पाहिलं न् दुसऱ्या क्षणीं त्यांना विसरलों.

त्या साऱ्या पटांगणांत, पिंऱ्याच्या डोंगरांत, पिंऱ्याच्या डोंगराला डौलदार वळण घेऊन जाणारी सावित्रीमाई–प्रत्येक ठिकाणीं मला एकच व्यक्ती दिसत होती. उग्रमूर्ती अण्णा! एकच प्रश्न मला भेडसावीत होता. आतां पुढें काय? ठाण् ठाण्–ठाण् ठाण्–ठाण् ठाण्–

मधली सुट्टी संपून शाळेची घंटा चालली होती. खिन्न मनानं ढोलींतून खालीं उडी टाकली. जड पावलांनीं शाळेंत गेलों. सबंध दुपारची वेळ कशी घालवली असेल, माझं मला माहीत. कादरची, चिठ्ठीची आठवण झाली की धस्स् व्हायचं छातींत. माझ्या आजवरच्या आयुष्यांत भीति हा शब्द इतक्या तीव्रतेनं मला कधीं जाणवला नव्हता. माराची भीति नव्हती असं नव्हे; पण वेळेला दणके खावेत अन् विसरून जावं, असं होतं. आजचा प्रसंग मोठा बांका होता. ठाण्-ठाण्-ठाण्-ठाण्...

शाळेची संध्याकाळची घंटा चालू होती. कादर केव्हांच गेला होता. अण्णांना चिठी मिळाली असेल. आतां घरीं जायचं न् जी काय शोभा होईल, ती करून घ्यायची. बसेल तो मार खायचा. मारापेक्षांसुद्धां मला बेअब्रूची भीति अधिक वाटत होती. मला धाडकन् आठवण झाली—आमची काशीत्या गेल्या वर्षी मेली, हें खरं–पण सुंदरात्या? मी विचार

केला होता,–मेलेली आत्या, तिला पुन्हां मारलं म्हणून काय बिघडतंय ? पण आतां सारं चित्र स्पष्ट होऊं लागलं. आत्या म्हणजे माझ्या मनानं काशीत्या–पण हें कुणीं मानील का ? जो तो मला शिव्या देऊं लागेल– ”
“ रांडेच्या, सुंदरात्याला मारायला कां निघालास ? ” अण्णांना काय वाटेल ? खुद्द सुंदरात्या ! काय वाटेल तिला ?

आत्या, आत्या––तुला उद्देशून मी नाहीं बोललों हें. कसं पटवून देऊं या लोकांना ? असलं अभद्र तुझ्याबद्दल कसं बोलेन मी ? माझ्या जीवनात तुझं स्थान अनन्य आहे, हें मी कसं विसरेन ?

खरोखरच आत्याचं माझ्या जीवनांतलं स्थान अनन्य होतं. माझ्या सुदैवानं परमेश्वरानं तिला भरपूर आयुष्य दिलं. खडतर संकटांच्या प्रसंगीं ती अजूनहि माझं डोकं वात्सल्यानं मांडीवर घेते ! “ ये बाळ, किती दमतोस रे” ! आत्याचे हे शब्द ! बस्स ! सारं विश्व एका पारड्यांत टाकलं तरी दुसऱ्या पारड्यांतील आत्याचे हे शब्द खालीं जातील. प्रेमाचा महिमा अगाध असतो यांत संशय नाहीं.

इतकी दुर्दैवी अन् इतकी प्रेमळ स्त्री माझ्या पाहाण्यांत नाहीं. “ हिंदु स्त्री म्हणजे त्याग आणि प्रेम याचं प्रतीक असतं ” असं गांधीजींनीं कुठं तरी म्हटलेलं आहे. कस्तुरबांना उद्देशून महात्म्याची वाणी असं वदली. आत्याच्या जीवनाकडे पाहिलं कीं महात्माजींचे हे शब्द मला आठवतात. अकराव्या वर्षी ती मागं आली आणि तेव्हांपासून अण्णांच्या आश्रयाला राहिली. मूर्तिमंत प्रेम तिच्या रूपानं आमच्या घरांत वावरत होतं. भावावर बहिणीनं कसं प्रेम करावं तें आमच्या आत्यानं साखरपेडीला दाखवून दिलं. अंगांत ताकद होती तोंवर ती मोठमोठ्या कार्यांतून स्वयंपाक करायला जायची. सुईणीचं काम करायला जायची. अशा प्रसंगीं तिला लुगडं मिळे. ती गतधवा होती. वर्षांतून दोन लुगड्यांपेक्षां अधिक लुगडीं वापरणं त्या साध्वीच्या दृष्टीनं वैधव्यधर्माला सोडून होतं ! “ लुगडं सवाष्णीचं द्या हो ” ती सांगे.

आपल्या गरीब भावाच्या ओढघस्तीच्या संसाराला आपल्यापरीनं हातभार लावणं यांतच तिच्या जीवनाची इतिकर्तव्यता होती. स्वतःची सोय-गैरसोय यांना तिच्या जीवनांत मज्जाव होता. अण्णा मला भावनाशून्य वाटत पण आत्याबद्दल बोलतांना त्यांचे डोळे डबडबलेले मी पाहिले आहेत. एवढं होतं तरी त्यांचं परस्परांचं प्रेम अखेरपावेतों अबोल राहिलं. प्रदर्शनाची गरज फक्त नखऱ्याला भासते हेंच खरं. आत्याच्या सल्ल्याशिवाय आमच्या घरांतील कोणताहि व्यवहार होत नसे एवढंच आम्हांला पाहायला मिळालं. आम्हां भावंडावर तिनं पोटच्या गोळयासारखं प्रेम केलं. विधात्यानं तिच्या वात्सल्याला वाव दिला नाहीं. आम्हांला कुरवाळून तिनं आपलं समाधान करून घेतलं. आम्ही सारीं भावंडं तिच्या मांडीवर लहानाची मोठीं झालों. आई कामाच्या रगाडयाखालीं असावयाची. बिचारीला आमचं कौतुक करायलासुद्धा फुरसत मिळत नसे. अशा वेळीं आम्हांला प्रेमाची सांवली आत्याच्या पदराखालीं मिळे. दादूमियाच्या जत्रेला जायला निघालों कीं कवाडीपर्यंत गेलों असलों, तरी तेथून हांक मारून बोलावील—

“ रघ्या——”

“ काय आत्या—” मी धांवत कवाडीपासून परत फिरायचों.

“ पैसे आहेत का ?” किती हळू विचारी. अण्णांना नाहीं कळतां कामा ! आणि कडोसरीचा एक आणा काढून देई. आत्याची कमाई ती काय–न् त्यांतलाच एकेक आणा ती आम्हांला द्यायची. निर्झरासारख्या या प्रेमप्रवाहाची माधुरी प्रत्यक्ष अनुभविल्याशिवाय नाहीं कळणार. अण्णा चोप देत असतांना त्यांच्या क्रोधाला न जुमानतां आम्हांला हिसकून घेऊन ती पोटाशीं घेई. आम्हां भावंडांत अण्णांच्या हातचा मार माझ्याइतका कोणीच खाल्ला नाहीं. कोपिष्ट बापाच्या पहिल्या मुलाच्या कपाळीं हेंच लिहिलेलं असतं. पुढ उतारवयामुळं म्हणा किंवा आणखी कशामुळं म्हणा, पण या क्रोधाची धार कमी होत जाते; न् शेवटी सर्वांत लहान मूल तर बापाच्या शेंडी-मिशांशीं बिनधोक खेळ शकतं ! अण्णांच्या क्रोधाचा लोप इतका

कधींच झाला नाहीं, तरी मार खाऊन वळ उठलेल्या पाठीवर सुंदरांत्याचा प्रेमळ हात फिरवून घेण्याचं भाग्य मात्र माझ्याशिवाय दुसऱ्या कुणाच्याच वांट्यास आल नाहीं.

कुणी मान कापायला निघाला, तरीसुद्धां सुंदरात्याची निंदा माझ्या तोंडून व्हायची नाहीं. मग पोंक्षे मास्तरांचा मार चुकवायला आत्या— तुझ्याबद्दल असं भलतंच कस बोलेन? पण हें कुणी मानील कां? सारे मला फाडून खायला उटतील. छे, छे! मी अशी थाप मारायला नको होती—!

जड अंतःकरणानं मी शाळेच्या पायऱ्या उतरत होतों. प्रत्येक पायरी-गणिक कादर-चिठ्ठी—धसका, असं चाललं होतं. डोकं बधिर! पाय जड. मी वाट चालत होतों; पण भानावर नव्हतों. मध्येंच थांबें, मध्येंच चालूं लागें. एकदां मनांत विचार आला—

" जास्तींत जास्त काय होईल? अण्णा बोलतील, शिव्या देतील, मारतील, डाग देतील. ठार तर नाहीं ना मारत? मग ही भीती कशाला पाहिजे?"

आणि शिथिल गात्रांना जोर आणण्याकरितां मी भराभर चालूं लागें. पण हा उसना दम दहा पावलंसुद्धां टिकेना. बापू जोशांच्या हाटेला-वरून सरळ ब्राह्मणवाडींत जायचा आमचा रोजचा रस्ता सुटला. सावित्रीकडे केव्हां वळलों माझ्या लक्षांत आलं नाहीं.

सावित्रीमाई! साऱ्या साखरपेंडीची अक्षरशः माता होती ती. नारळीपौर्णिमेच्या दिवशीं सारा गांव तिच्या दर्शनाला लोटतो. माणसं आपली जात गोत, धर्म, दर्जा—सारं कांहीं विसरतात. एकाच आदि-तत्त्वाचीं लेकरं म्हणून भेटतात—उस्मान खलाशी अस्सल हिंदुपद्धतीनं तिला नारळ अर्पण करतो. आतां त्याचा तो मानच होऊन बसला होता. सावित्रीच्या पुलावरून मी चाललों होतों.

साखरपेंडीचा सर्वांत रहदारीचा रस्ता आहे हा. मुंबई, कऱ्हाड, रत्नागिरी—साऱ्यांना सांधणाऱ्या मोटार सर्व्हिसी याच पुलावरून पुढं होतात.

पूल उतरून खालीं आलं, कीं मोटार युनियनचीं ऑफीसं थाटलेलीं आहेत. सकाळ-संध्याकाळ सावित्रीजवळ अनेक मोटारी धुवायला येतात. पुलापासून शंभर पावलावर मुंजाबाचा डोह आहे. डोहाच्या लगत गर्द हिरवी झाडी आहे. सावित्री या डोहांत धाडकन् उडी घेते न् महापुरुषांच्या घोंड्याला वळसा घेऊन आपला सागराचा रस्ता चालूं लागते. वळसा घेतल्यावर सावित्री झाडीआड दिसेनाशी होते. डोहाच्या मध्यावर महापुरुषानं—साखरपेंडी गांव ज्यानं वसवलं त्या थोर पुरुषानं—समाधी घेतली, अन् आतां तो तिथंच वास्तव्य करून आहे. महापुरुषाचा घोंडा म्हणून ज्याला ओळखलं जातं तो एक अजस्र काळा फत्तर आहे. महापुरुष रात्रीं बारा वाजतां या उंच फत्तरावर उभा राहून त्याच्या प्रिय साखरपेंडीचं मनमुराद दर्शन घेतो, साखरपेंडीचं स्तोत्र गुणगुणतो, तिचीं सारीं लेकरं सुखांत रहावींत, म्हणून प्रार्थना करतो न् डोहांत पुन्हा लुप्त होतो. सावित्रीचं पवित्र स्नान जोंवर महापुरुषाला घडतं आहे, तोंवर आमच्या साखरपेंडीला कशाचंहि भय नाहीं; ही पूर्वापार चालत आलेली समजूत आम्हां मुलांत फार प्रिय होती. पूल ओलांडतांना डोह आणि महापुरुष यांचे विचार आमच्या डोक्यांत आले नाहींत, असं कधीं झालं नाहीं. माझा तर ‘ महापुरुष ’ हा एक आवडता श्रद्धाविषय होता. “ काल रात्रीं महापुरुषाला डोहांत आघोळ करतांना मी पाहिलं ” या चालीवर अनेक थापा आमच्या जगांत मी पिकवीत असें आणि पचवीत असें.

उभ्या गांवालाच सावित्रीचं कौतुक फार. सावित्री जिथं समुद्राला मिळते, ती एक लहानशी खाडी आहे. खाडीपलीकडे गूळपेंडी गांव आहे. दोन गांवांतलं अंतर फक्त कांहीं यार्डांचं—सावित्रीच्या रुंदीएवढं आहे. साखरपेंडीच्या बाजूनं पलीकडे पाहिलं कीं इथैं बंदराकडून डोंगराला वाकडातिकडा कापीत येणारा गूळपेंडीचा रस्ता स्पष्ट दिसतो. शांत वेळीं गूळपेंडीच्या बैलतळावर गवत खाणाऱ्या बैलांच्या गळ्यांतल्या घंटासुद्धां स्पष्ट ऐकायला येतात.

अशा आमच्या या गरीब वरुणकन्येवर उस्मानखालोखाल मी प्रेम केलं आहे. तिला पावसाळ्यांत येणारं पाणी—त्याच्या फुटाफुटांची नोंद माझ्याजवळ असे. हे रिपोर्ट देण्यांत आमच्या जगांत मी एक अधिकारी व्यक्ती होतों. मिटक्या मारीत ऐकणाऱ्या समवयस्क मुलांच्या कोंडाळ्यांत त्यामुळं मी भलताच भाव खाऊन असें !

पण हीच सावित्रीमाई आज माझ्या स्मरणांतहि नव्हती ! पूल ओलांडला. मोटारस्टँड मागं टाकला. बाजार गेला. मशीद गेली. मासळी बाजार आला तेव्हां मी जागा झालों ! घरीं पोंचायचं म्हणजे अजून मैल-भर चालायचं होतं. मला जरा बरं वाटलं. अण्णांचा सारा प्रकोप मला प्राशन करायचा आहे, याची जाणीव पावलागणिक होत होती. लांबचा रस्ता काढून दिवेलागणीच्या सुमाराम घरीं जायचं ठरवलं मी. अशुभस्य कालहरणं !

मासळी बाजारांतून सरळ खालीं ब्राह्मणवाडींत जायचं मी सोडलं. मासळी बाजाराच्या तिठ्यावर आलों. पुढं काय ? तिठ्यावरून तीन रस्ते जात होते. एक सरळ ब्राह्मणवाडींत, दुसरा मुसलमान वाड्यांत, तिसरा मसणबिदीकडे.

मी एवढा बेडर मुलगा—पण मसणबीद म्हटलं म्हणजे मला सुद्धां भीति वाटे. तिठ्यावरून मसणबीद साधारण अर्धा मैल भरते. हें सारं अंतर सुतासारखं सरळ आहे. तिठ्यावरून मसणबिदीकडे पाहिलं कीं दर्याच्या फेंसाळणाऱ्या लाटा स्पष्ट दिसतात. गालबोट लहान मुलांना खुलून दिसतं. प्रमाणाचं असंच असतं थोडंसं. भयाणपणाचा भकासपणा वाढ-विण्याचं सामर्थ्य प्रमाणबद्धतेंत फार असतं. खुद्द मसणबीद लांबीला फार नाहीं. साधारण पांच मिनिटं चालीची आहे. पण तें सारं अंतर विलक्षण रेंखीव आहे. एका बाजूला मुसलमानवाड्यांतलीं नारळीचीं झाडं—नू दुसऱ्या बाजूला कोळीवाड्यांतलीं नारळीचीं झाडं—यांमधून मसणबीद तीरा-सारखा मार्ग कापीत जाते ! आणि याच बिदींतून " नारायण ! नारायण !! "

करीत साखरपेंडीची सारीं प्रेतं स्मशानांत जातात ! बाहेरख्याली तपस्वी ब्राह्मणाची उपमा मसणविदीला मी नेहमीं देत असतों.

पण माझ्या त्यावेळच्या मन:स्थितींत मसणविदीचं भय मला नव्हतं. मसणविदींतून जावं असं एकदां वाटलं पण मसणविदींतून घर म्हणजे फार तर अर्धा तास. इतक्या लवकर घरीं जायला मी साफ तयार नव्हतों. मुसलमानवाड्यांतून सरळ खाडीकडे जायचं आणि बंदरवाटेनं देवीच्या मुळवसांतून गांवात यायचं, असा तासाभराचा कार्यक्रम मी मुक्रर केला. तिठ्यावरून उलटा फिरलों आणि सरळ मुसलमानवाड्याची वाट चालं लागलों. दादूमियाचा पीर, शेरल्लीचं हाटेल मागें टाकून पुन्हा एकवार सावित्रीच्या बाजूनं चालूं लागलों. थोडंसं अंतर चाललों मात्र—विजेसारखी मला आठवण झाली—

कादर ! असाच खालीं चाललों म्हणजे ज्या मुळवसांतून बंदरावर जायचं, तो कादरचा मुळवस ! कादर आपल्याला भेटला तर ? तर काय ? कळेल कदाचित् अण्णा किती उखडले आहेत तें. कादरचं घर जवळ येऊं लागलं ! माझी मन:स्थिति ? मघां पाहिलेल्या कोळीवाड्यांतल्या ताज्या म्हावऱ्याची आठवण मला झाली.

शाळेंतून निघून बराच वेळ झाला होता. सूर्यनारायण मावळायला निघाला होता. थंडी पण पडूं लागली होती. बंदरावरून येणाऱ्या गार वाऱ्यानं याची मला जाणीव करून दिली खाडीवरून येतांना थंडीचा जोर वाढणार होता पण आज मी कशालाच जुमानायचं नाहीं, असं ठरवलं होतं.

एकेक पाऊल मी पुढं टाकीत होतों. एकीकडे मधूनच धस्स होई छातींत. अण्णा काय म्हणतील ? आई काय म्हणेल ? आत्याला काय वाटेल ? पुन्हां पुन्हां बसणारे हे धक्के मला आतां असह्य झाले होते. खिदळत जाणारं तें सावित्रीचं पाणी ! वाटलं कीं तिच्या प्रेमळ हृदयांत उडी घ्यावी न् तडफडत्या मनाला शांत करावं.

चालत चालत मी वडाशीं आलों. महापुरुषानं आमचं गांव वसवलं, तेव्हां त्याची आठवण म्हणून हा वृक्ष त्यानं लावला होता. अडीचशें वर्षांचा तरी तो असावा. या कालांत चार घराच्या खेडयापासून दहा हजार वस्तीच्या गांवापर्यंत साखरपेंडी लहानाची मोठी झाली. आमच्या पट्टयात साखरपेंडी फार मोठं व्यापाराचं केंद्र आहे. काजू–सुपारी–नारळ–भात--आंबे–फणस यांचा व्यापार फार मोठया प्रमाणावर खुष्कीच्या न् जलमार्गानं चालतो. साखरपेंडीचं हे सारं वैभव ज्या थोरांच्या आशीर्वादानं वाढलं त्यांच्या मालिकेंत या जटाधारी वृद्ध वटवृक्षाचं स्थान आहे. वडाशीं आलों न् मला काय वाटलं कुणास ठाऊक–वडाच्या चौथऱ्यावर उडी मारून तिथंच बसलों. खाडीशीं जाऊन थंडीवारा खात घरीं जाणं काय, न् तेवढाच वेळ इथं काढणं काय, मला सारखच होतं. मी तिथं बसलों न् माझं लक्ष समोर गेलं. तिथून कादरचं घर स्पष्ट दिसत होतं!

कोंकणांतलं तें नमुनेदार घर होतं. पोफळी–माडाच्या उंच शेंडयांनीं त्याची पार्श्वभूमि हिरवीगार दिसत होती. पोफळीची शिपटं न् नारळीच्या पेंडी ठिपक्यासारख्या दिसत होत्या. डौलानं आपला पिसारा पसरून मोरानं बसावं, तसं तें घर तेथून दिसतं. माझ्या भावी आयुष्यांत रम्य, भेसूर आठवणींनीं हें घर भरून जायचं होतं. आज माझ्या मनःचक्षूपुढं ते उभं राहिलं, म्हणजे एकाद्या क्रांतिकारकाच्या निवासस्थानामुळं भयानक विचार-मालिका सुरू व्हावी, तसं माझं होतं. खेडेगांवांतल्या मध्यम स्थितींतल्या माणसाचं तें घर होत. त्या घराच्या कोपरान् कोपऱ्यावर मी भावी आयुष्यांत प्रेम करणार होतों. काळया भिंती न् उन्हानं कोळपलेलं गवताचं छप्पर–वृद्ध भिल्ल खुरमांडी घालून बसावा तसं तें लांबून दिसे. घर पाहिलं न् एकदम मनांत विचार आला—

कादरला भेटावं! कळेल तरी तानमान काय आहे तें. समजा, अण्णा त्याला भेटलेच नसले तर? छे, छे हें कसं शक्य आहे? दोन वाजता तो निघाला. फार तर अडीचला घरीं पोचला असेल. यावेळीं वामकुक्षी आटोपून

अण्णा हडप्याजवळ पोथी घेऊन बसले असतील ! समजा, तो माझ्याकडे गेलाच नसला तर ? त्यानं माझ्यावर एवढी मेहरबानी करायला कांहीं कारण नव्हतं--पण बुडत्याला काडीचा आधार म्हणतात. मी त्याच्या घरीं जाण्याचा निश्चय केला न् खाली उडी टाकली—

प्रत्येक पावलागणिक तें घर आतां माझ्याजवळ येत होतं. माझ्या मनाला मी पुन्हा विचारी--

" विचारी मना, अण्णा चिठी वाचून जास्तींत जास्त काय करणार ? ठार तर नाहींना मारीत ? बस्स ! सोडून दे हा विषय. कादर-चिठी-धसका. हा काय प्रकार चालविला आहे ? "

पण छे ! माणसाची सारी शक्ती आत्मविश्वासांतून निर्माण होत असते. कादरचं घर दिसू लागलं न् माझ्या छातींतली धडपड कांहीं केल्या थांबेना.

एवढ्यात —

" बेंद्रे ! बेंद्रे ! " म्हणून मला हांका ऐकूं आल्या. मी चमकून सभोंवार पाहिलं. दूरवर शेताडींतून कोणीतरी माझ्याकडे पळत येत होतं. थोड्याच वेळांत मला दिसलं--

तो कादर होता ! कादर माझ्या समोर येऊन उभा राहिला. आमची दोघांची ती भेट ! आयुष्यांत कांहीं प्रसंग असे घडून जातात--दिसायला क्षुल्लक असतात. पण जन्मभर त्यांची आठवण आतांच घडले इतकी ताजी असते. माझ्या गतायुष्यातल्या क्षणांची उजळणी मनाशीं करूं लागलों, म्हणजे आमची ती भेट जशीच्या तशी डोळ्यासमोर उभी राहाते. त्यावेळीं आम्हांला कल्पनाहि आली नाहीं--भवितव्यतेंत शक्तिमान प्रेम रज्जूनीं आम्हीं बांधले जाणार होतों. कल्पनाहि नव्हती कीं या प्रेमरज्जूवर ताण करणाऱ्या शक्ती आमच्या जीवनांत प्रवेश करायच्या होत्या. आमच्या पिछाडीला सावित्रीमाई खळखळत होती. वीस पावलांच्या अंतरावर वट वृक्षाची धीर गंभीर मूर्ति उभी होती. आमच्या पहिल्या भेटीचं तें ठिकाण

विलक्षण रम्य आहे यांत संशय नाहीं. प्रतिपदेचा निस्तेज चंद्रप्रकाश आतां पसरत होता. कादरनं जाकिटाच्या खिशांत हात घातला न् ती चिठी बाहेर काढली !

“ कुठं होतास बेंद्रे इतका वेळ ? बापूच्या हाटेलाशीं किती वेळ वाट पाहात होतों तुझी. म्हटलं आतां येशील, मग येशील. ही चिठी घे न् फाडून टाक. ”

काय बोलावं मला सुचेना. क्षणभर वाटलं कादरला कडकडून भेटावं. इतका वेळ चाललेली माझ्या मनाची तडफड शांत झाली. माझे डोळे पाणारले.

“ कुठं निघाला होतास कादर ? ”

“ बाजारांत चाललों होतों–तूं दिसलास म्हणून इकडे आलों. ”

“ चल, मी येतों तुझ्याबरोबर. ”

आम्ही दोघे बाजारची वाट चालूं लागलों.

“ पोंक्ष्यांनीं चिठी दिली मला अन् असं झालांय सांगू तुला. मी म्हणालों ही कुठली पिडा आली–– ”

“ कादर–जन्मभर विसरणार नाहीं तुला. तुझं आश्चर्य वाटतंय मला. काय म्हणून तूं मेहेरबानी केलीस माझ्यावर ? ”

तुझा स्वभाव मला फार आवडतो. ”

“ कादर––दुसऱ्याला आवडावं असं माझ्यांत कांहीं आहे कां ? मुलुखाचा द्वाड मुलगा मी. सदा मारामारी करायची– ”

“ तेंच––तेंच आवडतं मला. पण माझा स्वभाव तुला माहित आहे. मला बोलायला फार कमी हवं असतं. त्यामुळं माझ्याजवळ कुणी फारसं येत नाहीं बोलायला. लहानपणापासून तुझ्या गुंडगिरीचा हेवा वाटतो मला. ”

“ मला नव्हतं वाटलं असं–तुझ्यासारखा हुषार मुलगा– ”

“ हुषारी काय करायच्ये नुसती–बेंद्रे ? ”

" मग तुला काय वाटतं–माझ्यासारखं गुंड असावं ? "

" हो ! मला तें साधलं नाहीं कधीं–पण तुझा गुंडस्वभाव मला आवडतो एवढं खरं— "

" तुझी हुषारी मला कधींच कशी आवडली नाहीं ? "

" मीं लावीन तुला आवडायला–"

" असं ? "

" होय ! "

जीवास जीव देणाऱ्या दोन सुहृदांची ती पहिली भेट होती. मागं टाकलेल्या सहजीवनाकडे आतां मी पाहूं लागलों म्हणजे आमच्या सुहृद-जीवनाची ही नांदीं नाट्यपूर्ण होती असं वाटतं.

" कादर, त्या चिठीचं काय करणार आहेस ? "

" ही घे—" त्यान माझ्यादेखत त्या चिठीचे बारिकबारिक तुकडे केले.

" आतां पोंक्ष्यांनीं विचारलं म्हणजे ? "

" तूं कांहीं काळजी करूं नको–चिठी हरवली त्याला मी काय करणार ? नवी चिटी ते देत नाहींत खास न् दिलीच तर मी पाहून घेईन, काय करायचं तें. तूं विषय काढून टाक डोक्यांतला. तें जाऊं दे–उद्यांपासून तूं येणार ना अभ्यासाला. "

" हो ! "

" बरं–मी जातों घरीं. आतां नाहीं बाजारांत जात. "

लुप्त होणारी कादरची पाठमोरी आकृती पाहात मी उभा होतों.

घरीं निघालों तेव्हां मनावरचं केवढं ओझं कमी झालं होतं ! आयुष्यांत कांहीं उणीव आहे याची जाणीव मला एथवर कधीं झाली नव्हती. ज्याच्याजवळ आपलं सुखदु:ख सांगतां येईल असं माणूस जवळ असणं याचं मोल काय–येथवर ठाऊक नव्हतं मला. आतां कळलं तें !

* * *

## : ३ :

यानंतरचं माझं आयुष्य बदलत चाललं. सपाटीवरून चाललेल्या प्रवाहाला अकस्मात उतार लाभावा तसं झालं माझ्या आयुष्याचं. मी पुंड होतों तसाच राहिलों—आजमितीला तसाच आहे. प्रकृतीपुढं इलाज नाहीं माणसाचा. पण आयुष्याकडे गंभीरतेनं बघायला मला कादरनं शिकवलं. माझा अभ्यास सुधारूं लागला. अभ्यासांतील बारकावे कादरपासून मी शिकूं लागलों, आणि एकेकाळीं पोंक्षे मास्तरांनीं ' ढ ' वर्गांत ढकलेला हा ' रघ्या बेंद्रे ' पांचवीची परीक्षा पास झाला तेव्हां त्यांच्या मनांत ' क ' वर्गापर्यंत गेला होता. यापुढचं माझं शालेय जीवन साऱ्या शिक्षकांचा एक चर्चेचा न् विस्मयाचा विषय होऊन राहिला. अण्णा भटजींचा ' रघ्या ' सातवींत गेला तेव्हां त्यानं ' अ ' वर्गापर्यंत मजल मारली होती. आणि सातवी इयत्ता आला तेव्हां तर या साऱ्यावर कळस झाला ! कादरला प्रतिस्पर्धी विद्यार्थी फक्त एकच राहिला—

" रघुनाथ अनंत बेंद्रे ! "

यापुढील वर्ष दोन वर्षं माझ्या आयुष्यांत अनेक अर्थांनीं क्रांतिकारक ठरलीं. चांगला विद्यार्थी म्हणून शाळेंतील माझी कीर्ती आतां वादातीत झाली होती. खुद्द पोंक्षे मास्तरांनीं घरीं येऊन अण्णांकडे माझी स्तुती केली होती. अण्णांनीं माझं कौतुक करायला हवं होतं—

—पण अण्णा हे जुन्या काळांतले तीर्थरूप होते. उभ्या जगानं मुलाचं कौतुक केलं तरी यांच्या तोंडाला सुरकुती नाहीं पडायची कधीं ! हल्लींच्या काळातील ' फसफसणारं ' प्रेम आणि दोन पिढ्या अगोदरचं

अबोल प्रेम यांना योग्य छेद साधणारा प्रेमदर्शनाचा मार्ग आमच्या कुटुंबांतून अजून अस्तित्वांत यायचा आहे. कौतुक बाजुला राहूं दे-- अण्णांचा क्रोध जागृत झाला म्हणजे ते अजूनहि पूर्वीसारखे बडवायला निघत.

पण आतां मार खाणारा रघु हा आजवरचा रघु राहिला नव्हता, हें ते विसरले होते. मी एक हुषार विद्यार्थी बनत होतों. मला मतं येत होतीं. व्यक्तित्त्वाचा मान ही नवी चीज या कालांत मीं पैदा करीत होतों. वर्गांत दहावाच नंबर कां-पांचवा कां नाहीं? एवढयापुरतीच या मानाची व्याप्ती राहिली नव्हती. माझ्या मानाला कांहीं तरी मूल्य येत होतं. या मूल्याकरितां धडपडणं ही पौरुषत्वाची पहिली खूण आहे याची जाणीव मला होत होती. एक साधा प्रसंग-आतां क्षुल्लकहि वाटेल—आहीं सहावींत असतांची गोष्ट. जॉर्ज बादशहाच्या राज्यारोहणानिमित्त शाळेंत पेढें न् बिल्ले वाटत होते. वीस सालांतील ही गोष्ट आहे. असहकाराचे छोटे तरंग साखरपेंडीपर्यंत आले होते. अशा परिस्थितींत आमच्या शाळेंत राज-निष्ठेचं प्रदर्शन मोठ्या प्रमाणावर करण्याचं योजलं होतं. गुलामगिरीचे हे पेढे आम्हांला नकोत —हे बिल्ले आम्हीं स्वीकारणार नाहीं असं छातीठोक-पणं सांगणारे शाळेंत दोन विद्यार्थी निघाले-एक मी आणि दुसरा कादर! अपमान-अन्याय यांची चीड आणि मानरक्षणार्थ त्याग करण्याची बुद्धी या दोन गोष्टी सहावीपासून माझ्या जीवनात शिरूं लागल्या आणि त्यांनीं पुढं अजस्र रूप धारण केलं.

अण्णांना हें कधीं कळलं नाहीं. कोणाच्या बापाला हें कळलं आहे तर अण्णांना दोष द्यायचा? बेकार झालेली पोथ्या-पुराणांतील वचन वेळीं-अवेळीं तोंडावर फेंकणारी ही मंडळी मुलगा सोळा वर्षांचा झाल्यावर त्याला मित्रवत् मानावं हें आपल्या शहाण्या पूर्वजांचं सांगणं मात्र गैरसोयीचं म्हणून विसरतात. आचार-विचार-आवडी-निवडी-संवयी-पोशाख-शेंडी

—संजाब सारं कांहीं आपण करतों तें उत्कृष्ट न् आदर्श ! पोरगं त्या बाहेर जाऊं लागलं कीं तें मुर्दाड !

सांगायचं तात्पर्य काय—आपलं पोरगं हुषार होत चाललं आहे हें कांहीं अण्णांना दिसलं नाहीं; पण——पण मुसलमान वाडयांतील अब्दुल तेल्याच्या घरीं तो तासन् तास असतो हें मात्र त्यांना एकदम दिसलं ! आपल्या किमान दोनतीन तरी वेदशास्त्रसंपन्न पिढयांचं वाटोळं करायला एकटा रघ्या पुरा पडणार हें त्यांचं मत शुक्रेदुवत् दृढ होत चाललं. साऱ्या म्हाताऱ्यांची वागण्याची पद्धत एका धाटणीची असते. गांवांत रिकामपणची कामगिरी म्हणून नको ते विषय चघळणारे लोक असतात. कोणीहि उठावं न् लागेल तें अण्णांना सांगावं—अण्णांनीं खरं मानावं असा प्रकार गेले बरेच दिवस चालू होता. एक दिवस अण्णांना बुद्धी झाली नाहीं—रघूला प्रत्यक्ष विचारून खुलासा करून घ्यावा. सारं मनांतल्या मनांत टेवायचं—ते खरंच असलं पाहिजे अशा विश्वासानं माझ्या हालचालींकडे पाहयचं हा त्याना छंदच लागून राहिला होता. कादरबरोबर मी मशिदींत जातों असंहि त्यांना कुणीतरी सांगितलं होतं—आणि त्यांना तें पटलं होतं !

अण्णा ! माझ्याकरितां नाहीं तरी निदान तुमच्या प्रतिष्ठेकरितां तरी असलं भलतंच कांहीं ऐकून तुम्हीं चिडायला हवं होतं—— मला जाब विचारायला हवा होता. उद्यां तुम्हांला कोणी सांगितलं—

"रघूची सुंता झाली न् तो बाटला !" तर माझी खात्री आहे पुराव्याला एक मिनिट सुद्धां लागायचं नाहीं. पण तुम्हीं नाहीं करणार तें. मुसलमानाचा शिक्का कपाळावर मारून तुम्हीं मला घरांतून बाहेर काढाल. अण्णांच्या या वागणुकीचा केव्हांतरी कळस व्हायचा होता. ती वेळ लौकरच आली.

कादरची दहा वर्षांची छोटी बहीण दिवंगत झाली त्याच्या दुसऱ्या दिवशींची गोष्ट. मियां, कादर यांना जबरदस्त धक्का बसला होता. सकीनेच्या मृत देहाला ऊदपाणी दाखविण्यापासून मला साऱ्या गोष्टींत

मदत करावी लागली. मृत देह पेटींत घालून सोनापुरांत नेण्यांत आला. तिच्या कबरेवर मी फुल-पाणी घातलं आणि मियां-कादर यांच्या समवेत परत फिरलों. वाटेंत मशिदींत ते 'फात्या फोडायला' गेले. नंतर आम्हीं त्यांच्या घरीं गेलों. प्रत्येक ठिकाणीं त्यांना मी हात देत होतों. मी घरीं जायला निघालों. मियां म्हणाले——

"रघ्बा, तुला फार त्रास पडलारे!" न् त्यांना दुःखाची जी उबळ आली, त्यासरशी प्रयासानं दाबलेल्या त्यांच्या शोकानं सारे बंध तोडले——ते लहान मुलासारखे रडूं लागले.

"मियां—मियां अम्माजानकडे पाहा, कादरकडे पाहा, तुम्हींच असं करूं लागलांत तर कसं व्हायचं? न् मला त्रास पडला म्हणून तुम्हांला वाईट वाटतं——तुम्हीं मला परका लेखतां-?"

"नाहीं——नाहीं. असं नको बोलू रघ्बा. तूं कादरसारखा आहेस मला." न् मियांनीं मला खरोखरच आपल्या मिठींत घेतलं——"असं कसं झालं रे- या अल्ला तेरा लाख लाख शुक्र है."

"असं कसं झालं! मियां-मी चांगल्या पायगुणाचा मुलगा नाहीं. मी तुमच्याकडे येऊं लागलों न् तेव्हांपासून पाहातोंय—तुम्हीं आजारी पडलांत न् आतां कळस झाला!"

"बस्स कर—बस्स कर. रघ्बा तूं फार बोलूं लागलास."

जरा वेळ आम्हीं स्तब्ध होतों. मी उठलों न् जाऊं लागलों.

"रघ्बा—एकटं नाहीं जायचं-कादर, कंदील घे, न् तिठ्ठ्यापर्यंत त्याला पोंचवायला जा. काळोख किती पडला आहे पाहा."

"मियां, ही वेळ नव्हे कादरनं मला सोबत करायची. तुमचे आशीर्वाद द्या मला——ते असले कीं मला कशाचंहि भय राहणार नाहीं."

वांकून मियांना मी नमस्कार केला न् त्यांचा निरोप घेतला.

हृदय फोडणारा तो प्रसंग होता. अण्णांना त्याचं काय होय?

दुसऱ्या दिवशींचा प्रकार. मी वरच्या माळ्यावर बसलों होतों. माजघरांत अण्णांच्या कर्णकर्कश आरोळ्या मला ऐकू आल्या--

" कुठं आहे गघडा तो. तोंड काळं करण्याची वेळ आणली आहे साल्यानं. मेला तरी फिकीर नाहीं. जाळून टाकीन बंदरावर न् मोकळा होईन. "

--धाड् धाड् करीत वरच्या माळ्याचा चिंचोळा जिना ते चढूं लागले. आयुष्यांत प्रथमच अण्णांना प्रतिकार करण्याची ऊर्मी माझ्या मनांत आली. ते शब्द--त्या शिव्या—

अण्णा– नाहीं कळायचं तुम्हाला चिमुरड्या सकीनाचं प्रेम. मुसलमानाकडील दूध मी पिणार नाहीं म्हणून दूध पिळायचा आग्रह मला करून तें मी प्यावं असला हट्ट धरून बसणारी सकीना--पण कोमल भावनांचा मक्ता फक्त ब्राह्मणांनाच दिलेला आहे असं अण्णांचं मत होतं! गोहत्या करणाऱ्या मुसलमानांत तर या भावनांचा लवलेशहि आढळणार नाहीं—ब्रह्मदेवाची ही शापवाणी आहे असं ते ठांसून सांगत!

अण्णा! अण्णा! सर्वनाश व्हायची वेळ आली तरी तुम्ही आपला हेकट दुराग्रह सोडणार नाहीं--मग या प्राथमिक गोष्टी तुम्हांला कशा पटवून देऊं ?

अण्णा किंचाळत जिना चढत होते. हातीं लागला तो सोटा मी उचलला आणि वरून तेवढ्याच जोरांत ओरडलों--

" अण्णा! खबरदार एक पाऊल वर चढाल तर— रध्या म्हणजे काय माडाच्या सांवळ्या समजलांत–चाहेल तर झांप करा, चाहेल तर केरसुणी करा ? तुमचा जुना रघ्या केव्हांच मेला–विसरा त्याला आतां. स्वतःचा मान ठेवायचा असेल तर तोंड मर्यादेंत ठेवा. अंगावर हात टाकायचा असेल तर बेंदऱ्यांच्या कुळात न झालेली बाप लेकांची मारामारी ओढवून घ्या. मग साऱ्या साखरपेंडीत बेंदऱ्यांची बेअब्रू झाली तरी बेहत्तर आहे. "

* * *

: ४ :

माझ्या आयुष्यांतील शेवटचा मानहानीचा प्रसंग होता तो. पुढें अनेक वर्षं अण्णांचा माझ्याविषयींचा राग शमला नाहीं. पण यानंतरचं माझं सारंच आयुष्य अकल्पनीय घडलं. खुद्द अण्णा थक्क झाले. सातवीच्या परीक्षेंत साऱ्या जिल्ह्यात मी दुसरा आलों. कारण आयत्या वेळीं परीक्षेला बसलो म्हणून; नाहींतर मी पहिलाच यायचों. थोड्याच दिवसांत साखर-पेंडीच्या शाळेंत शिक्षक म्हणून माझी नेमणूकहि झाली! त्या दिवशीं मला झालेला आनंद!

कांहीं गोष्टी अशा असतात--त्या अनुभवायलाच लागतात. तिथं वर्णनं तोटकीं पडतात. ज्या शाळेंत कांहीं काळ पुंड–नाठाळ–'ढ' वर्गीय विद्यार्थी म्हणून मी शिक्षण घेतलं त्याच शाळेच्या पायऱ्या एक माननीय शिक्षक म्हणून मी चढत होतों!

"या बेंद्रे मास्तर!" पोंक्षे मास्तरांनीं माझं पहिल्याच दिवशीं केलेलं तें स्वागत! अक्षरशः माझ्या अंगावर रोमांच उभे राहिले. माझ्या यशानं अण्णांच्या डोळ्यांत अश्रू उभे राहिले. कडवट आठवणींनी भर-लेल्या भूतकाळाची त्यांना कदाचित् आठवण झाली असावी!

पहिल्या महिन्याचा पगार रुपये दहा हातांत आला. येतांना सावित्रीच्या पुलाकडून आलों. महापुरुषाच्या डोहांत पैसा–सुपारी अर्पण केली. देवीच्या देवळांत गेलों. तिथं पैसा– सुपारी ठेवली न् घरीं गेलों.

"आत्या--ए आत्या—आई, आत्या कुठं गेली ग?"

" अरे हो पण, जरा श्वास टाक– " आईला माझ्या घाईचा अर्थ कळेना. आत्या देवघरांत बसली होती.

" अरे मी इकडे आहे रे–काय हवंय तुला ? "

मी आत्याकडे धांवत गेलों आणि तिच्या पायावर डोकं ठेवलं.

" शताउक्षी–उदंड आयुष्य घाल देवा माझ्या बाळाला. "

माझे डोळे भरले. कडोसरीचा चांदीचा रुपया काढला न् आत्याच्या हातावर ठेवला.

" आत्या ! कनवटीचा एकएक आणा आजवर तूं मला देत आलीस ! सारं विश्व तुला अर्पण केलं तरी त्याची सर त्या एक आण्याला यायची नाहीं. "

" रघ्या, पुरे हो. मिळाला मला रुपया. ठेव तुझ्याच जवळ. मला लागला कीं घेईन मागून. महापुरुषाला दिलास का पैसा ? "

" हो–येतांना देऊन आलों. देवीच्या देवळास पण गेलों होतों. "

" चुकायचा नाहींच माझा बाळ. आतां अण्णा आले कीं त्याच्या पायावर डोकं ठेव. अनी आईला विसरलासना ? त्या माउलीच्या खस्ता दिसायच्या नाहींत तुम्हाला–– "

" असं नको म्हणूं ग आत्या. तूं वडील आहेस ना घरांत ? "

" रखमाई–अगो, रखमाई–– "

आई हातणीशीं पाणी भरायला गेली होती. आत्यानं तिला बोलावलं.

" अग, लेकाचं कौतुक नाहीं केलंस आतां वेरी—आतां तरी घे त्याला जवळ. "

आईचे डोळे पाण्यानं भरले–माझे डोळे भरले. आईच्या पायावर मी डोकं ठेवलं.

" शताउक्षी–ये बाळ " आईनं मला जवळ ओढून घेतलं. आईनं जवळ ओढून घेतल्याचा माझ्या आयुष्यांतला बहुधा तो पहिला प्रसंग असावा !

"ये बाळ!" आईचे ते शब्द—माझं हृदय विरघळून गेलं. अतिशय कमी बोलणारीं माणसं असतात. त्यांच्या प्रेमाच्या—रागाच्या लहानशा उच्चारालासुद्धां विलक्षण धार असते.

कडोसरीचा दुसरा रुपया काढला न् आईच्या हातावर ठेवला. विन्या, काशी, बन्या—प्रत्येकाला मी चार चार आणे दिले. एक पैसा हातांत पडायची मारामार—नी कांहीं कल्पना नसतां चांदीचं एकेक नाणं त्यांच्या हातावर पडलं! त्यांचे चेहरे फुलले. रोज एक नाणं देऊन त्यांचा फुललेला आनंद लुटावा एवढं मोल होतं त्याचं. आमचं सारं कुटुंब त्या दिवशीं आनंदसागरांत बुडून गेलं. गरिबांच्या जीवनांत असले प्रसंग नेहमीं येणारे नसतात. असल्या क्वचित् काळीं येणाऱ्या प्रसंगीं हळु-वार भावना मुक्त होतात—त्यांना वाचा फुटते. कौतुक—हळहळ—दुःख—आनंद—या साऱ्या भावनांची आतषबाजी श्रीमंतांनीं करायची असते. यामुळंच भावनामय जीवनाची माधुरी गरिबाला जेवढी अनुभवायला मिळते तेवढी सुखांत लोळणाऱ्या माणसाला मिळत नाहीं.

आतां दर महिन्याला मी रोकडे दहा रुपये घरांत आणीत होतों! या दहा रुपयांचं मोल कळायला खेडेगांवांतील गरीब भिक्षुकाच्या घरींच जन्म घ्यायला पाहिजे!

* * *

: ५ :

" गुणाः पूजास्थानं, गुणिषु नच लिंगं नच वयः " पुण्याला ट्रेनिंग कॉलेजांत होतों तेव्हां हें वचन प्रथम माझ्या वाचनांत आलं आणि लोकमान्य वचनं कित्येक वेळां किती अवास्तव असतात याची खात्री पटली. नदीचं मूळ, ऋषीचं कूळ न् म्हणीची सत्यता पडताळून पाहण्याच्या भानगडींत भल्या माणसानं पडूं नये. एके काळचा उनाड " रघ्या बेंद्रे " आज ट्रेनिंग कॉलेजांत हुषार विद्यार्थी म्हणून नांदत होता आणि बुद्धिमत्तेच्या दृष्टीनं ज्याच्या आसपासहि मी फिरकूं शकणार नाहीं तो कादर दादरला घाणीवर तेल काढीत होता! पोंक्षे मास्तरांना आमचं दोघांचं हें भवितव्य पाहून विस्मयाचा धक्का बसला असता. गरिबी आणि परिस्थिती यामुळं अशी किती अव्वल दर्जाची बुद्धिमत्ता तेलाची घाणी चालविण्यांत, केंस कापण्यांत, चामडी कमाविण्यांत उभं आयुष्य घालवीत असेल!

कांहीं दृष्टीनं कादर माझ्यापेक्षां निःसंशय भाग्यवान होता. त्याची बुद्धिमत्ता असामान्य होती. सातव्या इयत्तेंत आम्हीं गेलों त्या वर्षभर अबदुल मियां आजारी होते. घरची तेलाची घाणी आणि इतर कामं यांतच कादरचा सारा वेळ जाई. हें सारं सांभाळून त्याला परीक्षेला बसणं जवळ जवळ अशक्य होतं. खुद्द माझा नी पोंक्षे मास्तरांचा आग्रह पडला म्हणूनच तो परीक्षेला बसला. साऱ्या जिल्ह्यांत तो पहिला आला. सातव्या इयत्तेंत येईपर्यंत मी कादरशीं सामना देणं ही कल्पनाच हास्यास्पद होती. पुढं मी मेहनती बनलों. भरीला कादरची घरची परिस्थिति डबघाईस येऊं

लागली. यामुळं सातवी इयत्ता आम्हीं दोघांनीं गाजविली. आमच्या चुरशीला पोंक्षे मास्तर कौतुकानं वाघ-सिंहाची झटापट म्हणत.

एवढं होतं तरी माझी पायरी मी ओळखून होतों. माझ्या यशाचं मूळ अविश्रांत मेहनतींत होतं. कादरचं सारं यश सहज होतं. कादरसारखे वडील लाभणं मला अजूनहि भाग्याचं वाटतं. आयुष्यांतील कर्तबगारीचं कौतुक इतरेजनांनीं करणं आणि खुद्द आई-वडिलांकडून होणं यांतील फरक माझ्यासारख्या माणसालाच फक्त कळेल. तो आनंद कांहीं न्याराच आहे. याबाबतींत मी निखालस पोरका होतों. एकदां कानफाट्या नांव पडलं कीं ती जन्माची कमाई होऊन बसते हेंही कारण असूं शकेल. कांहीं का असेना अण्णांकडून दोन कौतुकाचे शब्द मला कधीं ऐकायला मिळाले नाहींत— एवढं बरीक खरं. योग्य काळीं, योग्य माणसाजवळ मुलाचं योग्य कौतुक करावं तर अबदुल मियांनीच.

त्यांच्या घरीं माजघरांत आम्हीं कधीं कधीं गप्पा मारीत बसायचे— मी, मियां, अम्माजान. कादर कुठं बाहेर गेलेला असायचा. माझी जायची वेळ झाली म्हणजे मला ते हात धरून खाली बसवीत.

" अरे रघ्या-घाई कसली आहे ? आपले ' पंडित ' येऊं देत. मग जा. तुमच्या दोघांच्या गप्पा ऐकल्या म्हणजे बरं वाटतं जरा. "

' पंडित ' शब्द मियांचा फार आवडता होता. रंगांत आले कीं कादरला ते ' पंडित ' म्हणून संबोधींत. कादरबद्दल त्यांना रास्त अभिमान वाटत असे.

" वाटेल तें झालं तरी कादरला विंग्रजी शिकवायचं ! " मियां रंगांत आले कीं म्हणायचे. त्यांचं म्हणणं बरोबर होतं. कादरच्या बुद्धि-मत्तेला विशाल क्षेत्र मिळतं तरच तिच्या भव्यतेची कल्पना येती. पण यदृच्छा त्यानं घाणी चालवावी अशी होती !

अशा कितीतरी गोष्टी सांगतां येतील. कादर आणि माझ्यांत साम्या-पेक्षां विरोधाच्याच गोष्टी अधिक होत्या. इतक्या विषम जगांत वावरणारे

आम्हीं इतके एकरूप कसे होऊं शकलों हीच नवलाची गोष्ट आहे ! माझे वडील मुलखाचे खाष्ट तर अब्दुल मियां मुलखाचे लागट.

कादरखालोखाल त्यांनीं माझ्यावर लोभ केला. कादरचे माझे जिव्हाळ्याचे संबंध हें त्याचं कारण असूं शकेल; पण साऱ्या साखरपेंडींतच मियां प्रेमळ म्हणून प्रसिद्ध होते. मुसलमानी पद्धतीची तांबडी लुंगी, तुंद पोटावरनं रुळून खालीं आलेला मळका गंजीफ्राक, डोक्याला बांधलेली टापशी आणि एका हातांत काळ्या बेरीनं मढलेलं तेलाचं मडकं घेऊन चाललेली मियांची गिड्डी मूर्ति प्रत्येक साखरपेंडीकराच्या दृढ परिचयाची होती. गांवांत उंड्या गोळ्या करून अर्धेलीच्या करारावर गाळण्याचा त्यांचा मुख्य व्यवसाय होता. तसं पाहिलं तर मियांना कादरच्याहि अगोदरपासून--शाळेंत जात नव्हतों तेव्हांपासून--मी ओळखत होतों.

अण्णा-मियांची उंड्या आणि तेल यावरून होणारी हमरी–तुमरी मी अनेक दिवस पहात आलों होतों. " अन्हा..." करून मियां पडवींत यायचे न् पायठणीजवळ बसायचे. खुरमांडी घालून उभ्या ढोंपरावरून लांब सोडलेले हात–अशा थाटातील त्यांचं चित्र मला अजूनहि चांगलं आठवतं. आम्हीं जवळ गेलों कीं ते पोटावर टिचकी मारीत. एक दिवस अण्णानीं हें पाहिलं न् माझ्या अंगावर ते खेंकसले—

" शिंचो, इथं कशाला मरायला आला आहेस--चल पळ विहिरीवर न् आंघोळ कर. "

त्या दिवसापासून मियांचं वात्सल्य आम्हांला पुनःश्च अनुभवायला मिळालं नाहीं ! त्या दिवसांत मला एक आश्चर्य असं वाटे– अण्णा एवढे कडाडून बोलतात न् म्हातारा स्तब्ध कसा ! दोन पायली उंड्याचं बेलींत आणलेल तेल बरोबर आहे हा मुद्दा यत्किंचितहि न सोडतां मियां हंसत हसत उत्तर द्यायचे न् अण्णा आदळत आपटत तेलाचं मडकं माजघरांत न्यायचे. मियांची माझी एथवर तोंडओळख होती.

कादरकडे मी प्रथमच गेलों तेव्हां माझ्याकडे हंसून मियां एकदम म्हणाले—" अरे, अण्णा भटजींचा रघ्ना इकडे कोणीकडे ? संभाळ हं—अण्णा मारतील ! "

" अण्णा मारतील ! " म्हातारीं माणसं कांहीं वेळ असं कांहीं बोलून जातात—सहीस सही पडताळा येतो. मियांचे हे उद्गार खरे ठरायची वेळ पुढं एकदां आली होती. पण यावेळीं " अण्णा मारतील " कडे माझं लक्ष नव्हतं. " रघ्ना " हेच शब्द माझ्या कानांत घुमून राहिले. मियां मला नांवानं ओळखत असतील असं वाटलं नव्हतं हें पहिलं—आणि नुसतं टोपण नांवानं नव्हे तर " रघ्ना ! ". त्या एका शब्दानं मियांनीं मला सर्वस्वी जिंकलं. एथवर ' रध्या ' या उद्धट नांवाशिवाय दुसरं कांहीं ऐकायची संवय माझ्या कानांना नव्हती. किंबहुना ' रघ्ना ' हें नांव ऐकेपावेतों ' रध्या ' मध्यें कांहीं उद्धटपणा आहे असंहि वाटलं नव्हतं ! मुलांच्या सुंदर नांवांचे उद्धट अपभ्रंश करण्याची कला आमच्या कोंकणात कळसास पोंचलेली आहे. ' रघुनाथ ' चं ' रध्या ', ' अवधूत ' चं ' औध्या ', ' अनुसूया ' चं ' अनूशी ' असं प्रत्येक नांव तावडींत सांपडलं कीं त्याचा संकासूर झालाच ! तेव्हां मियांच्या ' रघ्ना ' तील स्निग्धतेनं मला मोहून टाकलं यांत नवल नाहीं. माझ्यांतील मानबिन्दु जागृत करण्याचं कार्य त्या एका शब्दानं केलं होतं. संध्याकाळीं शाळा सुटली कीं कादरच्या घरीं अभ्यासाला जायचा माझा क्रम असे. घाणीच्या बैलाला ' हटॅट–च्यॅक ' करीत मियां बसलेले असायचे. आम्हांला पडवींत पाहतांच तेथून ओरडायचे—" या रघ्ना ! " दिवे लागणीपर्यंत आमचा अभ्यास चाले. फारच उशीर झाला म्हणजे खुद्द मियां कंदील घेऊन कोळीवाड्यापर्यंत मला पोंचवायला येत. मला काळोखाचं किंवा जनावराचं भय कधीं वाटलं नाहीं. पण मियांना तें पटत नसे. माझ्या 'नको नको' ला बाजूला करून ते वाट चालूं लागत आणि गप्पा मारीत कोळीवाड्याच्या तिठ्याशीं आले तरी परतत नसत. मे महिन्यांत आंब्या—

फणसाचा मोसम आला म्हणजे नको मियांकडे जाणं असं करून टाकायचे. अभ्यास संपवून घरीं जायला निघालों म्हणजे अवचित कुठून तरी प्रगट होत.

" वा–वा–वा रघ्बा, अरे चाललास कुठं ? थांब जरा. "

" मियांसाहेब उशीर होईल आतां. मी जातों. "

" अरे समजलं–असं कुठं झालाय–घरींच जायचं आहे ना ? जाशील ! कादर, ए कादर, अरे तो कापा फणस आण इकडे. सारा दिवस ठेवून दिलास रघ्बाकरितां न् तो तर निघाला. "

" त्याचं पोट फुगलंय म्हणतोय तो. "

" बाऽरं, बाऽरं, तूं आण तर खरा. देहाला शोभेल असं बोलावं माणसानं. हं–रघ्बा–घ्या हा फणस, ही कोयती. तुझ्याकरितां वेगळी ठेवलेली आहे हं. आम्हीं वापरीत नाहीं ती. चल फोड. खोबऱ्या फणसाचा आहे विहिरीजवळच्या. नवं रघ्बाच्या हातून करायचं यंदा, असं ठरवलंय आम्हीं. "

ही प्रेमगंगा थोपविण्याचं सामर्थ्य माझ्यांत नव्हतं. मोसमांतला माझा पहिला फणस, पहिला आंबा कित्येकवेळां मियांकडेच खाऊन होत असे. कादरला मी अनेक वेळां म्हटलेलं आहे– " कादर, मुसलमान शोभत नाहीं तम्हीं. "

* * *

## : ६ :

मुसलमान म्हटलं म्हणजे कांहीं ठराविक कल्पना, अंदाज आम्हीं निश्चित केले होते. आमची शाळेंत जायची जवळची वाट म्हणजे मुसलमान वाड्यांतून. त्यांच्या जीवनाचं जवळून निरीक्षण करण्याची संधि आम्हांला रोज मिळत असे. त्यांच्या हॉटेलाचे गलिच्छ आरास, विड्याचीं थोटकं-काडद्या-कचरा यांत दाटीनं मांडलेली डागळलेली संगमरवरी मेज न् त्याभोंवतीच्या वांकलेल्या लोखंडी खुर्च्या, त्याभोंवतीं बसलेले पिंजारलेल्या केंसांचे मुसलमान, त्यांचे भडक दांत न् मळके कपडे, भल्या थोरल्या कढईतून भज्यांचे घाणे काढीत असलेला रस्त्याच्या कडेचा बबर्जी–हीं दृश्यं आमच्या इतकीं परिचयाचीं झालीं होतीं कीं त्यांतील अस्वाभाविकपणाचा किंवा विस्मयाचा पूर्ण लोप झाला होता. तोटक्या केसांचा, अदबीची भाषा वापरणारा, नीटनेटका पोशाख केलेला एखादा मुसलमान पाहिला म्हणजे आम्हीं त्याच्याकडे पाहात राह्यचों ! "तेरा मा———" नं सुरु होणाऱ्या शिव्यानिशीं, हमरीतुमरीवर येणारे मुसलमान आम्हीं अनेक वेळां पाहयचों. साखरपेंडीला पाऊण वस्ती मुसलमानांची आहे. पण शाळेंत शिक्षण घेणारीं त्यांचीं मुलं निम्मेसुद्धां नसत. मुसलमानाला शिक्षणाची फारशी जरून नसते असं आमचं मत होतं. भाद्रपद महिन्यापासून आमच्या गांवांत पतंग उडवायला सुरवात होते. पतंग उडवायचं वेड साखरपेंडीच्या मुसलमानांत फार. बाप्यांपासून बाबा लोकांपर्यंत अनेक

मुसलमान लोक खाडीवर पतंग उडवायला जमा व्हायचे न् अशा वेळीं इवल्याशा कारणावरून मारामाऱ्या व्हायच्या.

मी चौथींत असतांची गोष्ट. मुसलमानवाड्यांतून शाळेंत चाललों होतों. माझ्याच वयाचं एक मुसलमान पोर रस्त्यांत पतंग उडवीत होतं. माझा पाय पतंगाच्या मांज्यांत अडकला न् तो मांज्या तुटला. वसकन् तें पोरगं माझ्या अंगावर धांवून आलं. मी त्याच्या दिढीनं तरी होतों. माझ्यावर धांवून येण्याची त्याची जिगर पाहून मी तर थंडाच झालों ! "तेरा मा ऽऽ" करीत तो धांवून आला. त्याची ती शिवी कानावर पडली मात्र–कोणाला शिवी देतोय कल्पना नव्हती बिचाऱ्याला. मोडक्या तोडक्या हिंदींत बडबडत मी त्याची मान पकडली––

"साला, रस्तेका उपर पतंग उडाता है और उप्पर आवाजी ? आँ ? क्यॅ— समजते है क्या तुम् हमकु ?"

एका हिसक्याचं धनी होतं तें पोरगं. तात्काळ तो वांकडा तिकडा रस्त्यावर लाल धुळींत आदळला. अन् मग मात्र एकदम कुठूनशीं आठ-दहा पोरं गिल्ला करीत माझ्या भोंवतीं जमलीं. गिरक्या मारीत गुद्दे लगावण्याचं माझं गर्दीतल्या मारामारीचं तंत्र सुरुं केलं न् प्रसंग अंगाशीं येणार हें लक्षांत येतांच तेथून पोबारा केला. तरीपण दगडाचा मारा करीत त्या पोरांनीं कांहीं अंतरापर्यंत पाठलाग केलाच ! शाळेच्या हद्दीशीं आलों न् तोंड फिरवून "आव साला––आव साला" करीत झालेल्या फजितीचा सूड घेतला. पण तें आव्हान ऐकायला तीं पोरं तिथं नव्हतीं !

असल्या नित्याच्या दृश्यातून जन्मास आलेली मुसलमानांसंबंधींची माझी कल्पना फारशी मातबर नव्हती. मला लहानपणीं एक कोडं पडायचं. "या मुसलमानांना दिवसाचे चोवीस तास चकाट्या पिटायला मोकळे कसे असतात ?" शेरल्लीचं हॉटेल हा तर साखरपेंडींतला एक जबरदस्त अड्डा होता. खुद्द शेरल्ली हा नांवाप्रमाणं वाघासारखा दिसे. त्याच्या लाल झुबकेदार मिशा, बोकडासारखे वाढलेले केंस, रुंद जबडा, अस्ताव्यस्त

देह—साखरपेंडीचं तें एक मोठं प्रकरणच होत. संध्याकाळीं डुलत डुलत तो खाडीवर फिरायला जाई. पठाणी लेंगा, मलमलचा तलम अंगरखा न् बेरंगी फडकं डोक्यावर मागं फिरवून बांधलेलं अशा थाटानं तो निघे. त्याचं बोलणं, चालणं, वागणं सारंच बेछुट होतं. "शेरल्ली चालला!" त्याला पाहून लोक गुणगुणत. तो नेहमीं सुरा बाळगून असे.

त्या सालीं मी तिसरींत होतों. मारुतीची पालखी पाहायला म्हणून बाजारांत गेलों होतों. मशिदीवरून पालखी चालली होती. कांहीं कल्पना नाहीं. आणि एकाएकीं मिरवणुकीवर दगड येऊं लागले. साखरपेंडीच्या हिंदुमुसलमानांची ती पहिली मारामारी होती. मारामारी होणार हें कुणाला ठाऊक नव्हतं. टाळ, मृदंग यांच्या साथींत बेहोष झालेली भजनी मंडळी— "राम लक्ष्मण जानकी—जय बोलो हनुमानकी" हा जयघोष करीत चालली होती. मशिदीशीं पालखी आली. मशिदींतून एक म्हातारा फकीर बाहेर आला—

"सब बाजा बंद करो, यहांसे पीछे हट जाव. मजीदके उप्परसे आगे नहि जाना. आये रस्तेसे पीछे लोट जाव."

त्या फाटक्या फकीराचा रुबाब चीड आणणारा होता. मी मनांत म्हणालों—

"थोबाडा लेकाला! आम्हीं मेलों तरी बेहत्तर आहे—मागं नाहीं फिरतां कामा."

तो काय म्हणाला त्याकडे कुणाचंच लक्ष नव्हतं. भजनी मंडळी मशीद ओलांडून पुढं झाली मात्र—पालखीच्या पुढून, पिछाडीकडून, मशिदींतून दगडांचा मारा सुरु झाला. कांहीं वेळ गोंधळ माजला. भजनी मंडळीला तिथंच रोखून धरण्यांत आलं, पालखी तिथंच थबकली. साऱ्या हालचालींचा रोख पालखी खडी करून खालीं पाडण्याकडे होता. समोरून मारा होऊं लागल्यामुळें भजनी मंडळी मागं सरकूं लागली. तें सरकणं नव्हतं—कोणाचा पायपोस कोणाच्या पायांत नाहीं अशा स्थितींत सारी

मंडळी पालखीच्या दिशेनं धांवूं लागलीं. थोडयाच वेळांत पालखीभोंवतीं भेदरलेल्या पाचशें माणसांचं कोंडाळं झालं. एकोणीस वर्षांचा काश्या कोळी इतका वेळ पालखीच्या भाईला होता. त्याची मान खालीं होती. त्यानं वर पाहिलं. त्याचा धाकटा भाऊ गणपत डोक्याला खोंक पडून रक्तबंबाळ स्थितींत त्याच्याकडे येत होता. काश्यानं एकवार त्याच्याकडे पाहिलं. सारी परिस्थिति त्याला कळून चुकली. आतां दगड त्याच्याही अंगाला भिडूं लागले होते. काश्यानं भाई सोडली. पालखीची एक डेली गणपतच्या हातांत दिली; दुसरी स्वतः घेऊन ते पुढं झाले-क्षणाचाहि विचार न करतां पुढें झाले. पालखीला पुढं वाट मिळाली नाहीं तर तिची विटंबना ठेवलेली होती. समोर वीस-पंचवीस मुसलमान ठांसून उभे होते. विशीच्या आंतले ते दोन छावे चवताळून पुढं झाले न् दगडांचा मारा खात खात त्या लोकांना जाऊन भिडले. जोरानं येणारे दगड काश्याच्या भिरभिरणाऱ्या डेलीवर दाणकन् आदळून हवेंत वांकडे तिकडे फेकले जात. कित्येक त्याच्या अंगाला भिडत होते. पण आतां पालखीला वाट मिळूं लागली. दगडांचा मारा करीत करीत मुसलमान मागं सरकत होते. डेलीच्या पल्यांत येण्याची छाती नव्हती त्यांची. एकेका फेरीला एकेक डोकं फुटलं असतं-असलं विलक्षण सामर्थ्य त्या फेरींत होतं. एवढं यश मिळाल्यावर अनेकांना हुरूप चढला. हातांतले टाळ गोंफणीसारखे फिरवीत सारे कोळी पुढं झाले. फाटक्या अंगाचा काश्या असं कांहीं करूं शकेल असं कुणाला वाटलं नव्हतं. त्या धमालींत कोण कुणाला फटकावीत आहे याचा निर्णय लावणं कठीण होतं. घाबरून मी सार्वजनिक वाचनालयांत पळालों. आणि खिडकींतून पुढं काय होणार तें पाहूं लागलों. काश्या आणि गणपत यांची शरीरं आता लाल झालीं होतीं. प्रत्येक चिळकांडीला त्यांचा त्वेष वाढत होता-पालखी पुढं जात होती. एकीकडे भीतीनं माझी गाळण उडाली होती; पण बाहेरची ती धमाल पाहाण्याचा मोहही आवरेना. मी डोकावून

पाहात होतों. तेथल्या त्या धमालींत एक धिप्पाड माणूस दोन्ही हात वर करून ओरडत होता—

" भाई, बंद करो–ठेरो–हट जाव ! "

त्याची हनुवटी साफ चिरली होती आणि तेथलं मासरूड खालीं लोंबत होतं. तो शेरल्ली होता ! शेरअल्ली आणि मारामारी थांबवतो आहे ! मी प्रत्यक्ष पहात होतों तरी खरं वाटेना मला. आणि दुसऱ्या दिवशीं सारी सांखरपेंडीसुद्धां एकच विषय बोलत होती—

" कालच्या मारामारीला कारण शेरल्ली ! "

शेरल्ली एका हाटेलचा मालक म्हणून नांदत होता. पण साखरपेंडीनं त्यावर कधींच विश्वास ठेवला नाहीं. दोन भावाचे खून करून आणि पचवून तो सरहद्द प्रांतांतून इकडे पळून आला आहे असं लोक म्हणत. तो कांहीं वयानं मोठा नव्हता. पंचविशीच्या आंत बाहेर असावा. एवढ्याशा लहान वयांत त्यानं दाखविलेलं कर्तृत्व असामान्य नव्हतं असं कोण म्हणेल !

या शेरल्लीसारखेच सारे मुसलमान असणार असं आमचं ठाम मत होतं !

* * *

: ७ :

या पार्श्वभूमीवर अब्दुल मियांसारख्या स्निग्ध माणसाची भेट हा माझ्या आयुष्यांतील जबरदस्त अपेक्षाभंग होता. त्यांच्याकडे मी घरच्या सारखा वावरत असें. मला न ओळखणारे मियांचे नातलग त्यांच्या घरीं आले म्हणजे मला ते पाहात. त्यांना भारी चमत्कारिक वाटे. इरफान कमाल-मियांचे एक आप्त— असेच एकदा मुंबईहून आले होते. तेव्हां मी, भाभी ( कादरची बायको ), अम्माजान ( कादरची आई ), कादर गप्पा मारीत माजघरांत बसलों होतों. कांहीं वेळानं मी घरीं परतलों. परपुरुषा-पुढें मियांच्या कुटुंबीय स्त्रियांनीं खुशाल गप्पा मारीत बसावं हें त्या पाक मुसलमानाला बिलकूल खपलं नाहीं.

“ अब्बाजान, तुमचं घर बरंच सुधारलेलं दिसतं आहे. त्या पंच-विशीच्या बाप्यांशीं भाभी खुशाल बोलत होती. पडदा नाहीं—कांहीं नाहीं. आम्हां मुंबईकरांवर तुम्हीं ताण केलीत ! ”

“ बेटा, रघ्बा हा मला मुलग्यासारखा आहे. प्रसंग आला तरच रघ्बासारख्या माणसाची किंमत जगाला कळते. तोंवर असलीं माणसं तुमच्या आमच्यासारखींच वावरत असतात न् आपण अशी टीका करतों. भाऊबीजेला भाभीला प्रेमाचा रुपया देणाऱ्या माणसाकडे मी जर संशयी दृष्टीनं पाहणार असेन तर त्या अगोदर अल्लानं माझे डोळे आंधळे करणं मी पसंत करीन. ”

“ अब्बाजान, तुम्ही फारच लावून घेतलंत. मी सहज बोललों—”

" आपल्यापैकीं पुष्कळ लोक असं बोलतात रे. वाईट वाटतं असं कांहीं ऐकलं म्हणजे. मला ऐकवायचं होतं कुणाला तरी–बरं झालं तूं हा विषय काढलास तें. "

मियांनीं माझ्यावर खरोखरच बापासारखं प्रेम केलं. आमच्या अण्णांना हें कधीं आवडलं नाहीं. प्रथम प्रथम तर त्यांनीं भलतंच आकांडतांडव केलं.

एका अर्थीं त्यांचं बरोबर होतं. पिढयान् पिढया आमचं घराणं भिक्षुकीचं. आमच्या वडिलांपर्यंतची परंपरा दशग्रंथी ब्राह्मणाची. मला वेदशास्त्रसंपन्न करण्याकरितां जिवाचा आटापीट केला त्यांनीं. पण पुरुषसूक्ताच्या पठणांतच माझे प्रताप मी एवढे दाखविले! अण्णा संथा देऊन बाहेर जायचे. त्यांनीं बाहेर पाऊल टाकायचीच खोटी––मी, बन्या, किश्या, अच्या आमच्या पडवीचं पानिपत करून टाकायचों. आत्या आतून ओरडत असायची––

" रघ्या, रांडेच्यानों मारामारी करता–अण्णा मारायला लागले कीं ओढून घ्यायला येणार नाहीं मीं. "

देतो कोण लक्ष आत्याकडे. बिन्याला कवाडीशीं उभं करून ठेवायचं. अण्णा लांबून दिसले कीं बिन्या ओरडे––कुं–ऊं–– ! ही कोकिळेची हांक म्हणजे आमची धोक्याची सूचना होती. विस्कटलेली तरटं भराभर व्यवस्थित करायचीं न् सोज्वळ चेहऱ्यानं पठणाला पुनःश्च हरी ॐ!

पुढं पुढं अण्णांना आमचा संशय येऊं लागला. आत्याला देखरेख करायला सांगून ते बाहेर जाऊं लागले. पण तिथं सुद्धां आमची चांडाळ चौकडी पुरून उरली. आत्या नाहींसं पाहून धमाल सुरू–कुठं चिकोडीच लाव, कुठं दंडावर गुद्दे मारून घेण्याची शर्यत लाव–असे अनेक प्रकार हुडकून काढून आम्हीं जिवाला खेळवीत राह्यचों. आत्याचा पाय वाजलारे वाजला कीं जोरानं पठणाला सुरवात.

"निष्कंभ: प्रीति आयुष्मान–सौभाग्यस्तदनस्तथ:" आत्या केव्हांहि पडवींत आली तरी तिच्या कानांवर ही ठराविक संथा पडे!

कंटाळले अण्णा शेवटीं! असल्या आक्रसताळी बापाला शरण आणणारा बेटा किती कर्तबगार असला पाहिजे! तापट पण तापसी आणि विद्वान म्हणून अण्णांना आमच्या गांवांत एक वैशिष्ट्यपूर्ण स्थान होतं. दुपारीं बारा वाजतां नेसूं धाबळी न् हातांत पूजासाहित्य अशा थाटांत देवीच्या देवळास चाललेली अण्णांची उग्र, काटकुळी मूर्ति रस्त्यांत कोणालाहि भेटली तरी लोक त्यांना वाट करून देत. या समयीं त्यांच्या सोंवळयाचा भंग झाला तर आपल्या बेचाळीस कुळाची उद्धरगत झाल्याशिवाय राहणार नाहीं हें सर्वांना ठाऊक होतं; पग यापेक्षांसुद्धां सर्वांना त्यांच्याविषयीं वाटणारा आदर हाच अशा वेळीं अधिक प्रभावी असे. माझ्या जन्मापूर्वीची गोष्ट आहे. एका महार कुळाशीं मक्त्यावरून अण्णाची कांहीं बोलाचाली झाली. महारसुद्धां जब्बरा होता. त्यानं अण्णांवर मूठ मारली. मूठ मारण्यांत हा महार विलक्षण प्रवीण होता–चोवीस तासाभरांत माणसाला रक्ताच्या उलटया होऊन माणूस मृत्युपंथाला लागत असे. अण्णांना हें कळलं. मध्यरात्रीं ते उठले. समुद्रस्नान करून देवीच्या देवळांत ओलेत्यानं सप्तशतीच्या पाठाला त्यांनीं सुरवात केली! मूठ तीन दिवस देवळाभोंवती घिरटया घालीत होती! दर मध्यरात्रीस अण्णा समुद्रस्नानाला बाहेर पडायचे. छाती झाली नाहीं मुठीची अण्णांना स्पर्श करण्याची! तीन दिवस अण्णांची तामसी तपश्चर्या चालू होती. देवीच्या तीर्थाशिवाय अण्णांनीं या तीन दिवसांत कांहीं प्राशन केलं नाहीं वा खाल्लं नाहीं. चौथ्या दिवशीं मुठीचं सामर्थ्य संपलं! तपोतेजापुढं तिचं कांहीं चालेना–ती मागं फिरली! महार शरण आला!

गोष्ट खरी खोटी, मला माहीत नाहीं; साखरपेंडीचे सारे लोक ही कथा तुम्हांला ऐकवतील. गांवांत कांहीं उणा-अधिक प्रकार झाला म्हणजे अण्णा खवळत. मी म्हणायचों––

" यांना काय करायची आहे साऱ्या साखरपेंडीची उठाठेव! आपलं घर सांभाळावं. जग पुढं चाललं आहे. रूढीबाह्य गोष्टी आतां रोज होत राहणार."

असे हे आमचे अण्णा स्वतःचं पोरगं मुसलमानाकडे तासन् तास पडलेलं असतं म्हटल्यावर किती खवळावेत? प्रतिकाराला ज्या दिवशीं मी उभा राहिलों त्या दिवशीं मात्र अण्णांची खात्री पटली– 'आपले दिवस संपले!'

माझ्या तोंडावर उद्धरगत होण्याचे दिवस संपले हें खरं होतं. पण अण्णांचा पीळ कधींच गेला नाहीं. संध्याकाळीं घरीं आल्यावर मला स्नान करावं लागे. अण्णा माझ्या बरोबर जेवायचं कटाक्षानं टाळीत. क्वचित् कधीं वेळ आली तर माझं पान त्यांच्या पंक्तीला येणार नाहीं याविषयीं आईला काळजी घ्यावी लागे. मी रोजगारी झाल्यावरसुद्धां हा प्रकार बंद झाला नाहीं. आणि हें सारं कां?

माझा जिव्हाळ्याचा मित्र मुसलमान म्हणून! माझ्या आयुष्यांतील क्रांति केवळ कादरमुळं घडून आली होती. त्याची गोड फळं खुद्द अण्णांना मिळत होतीं. अण्णांना हें दिसत नव्हतं का? आंधळ्याला ज्या गोष्टी दिसल्या त्या अण्णांना दिसल्या नाहींत असं कसं म्हणूं मी? पण मरेपर्यंत अण्णांनीं माझ्या या घरोब्याला कधीं संमति दिली नाहीं. एथवर थांबतं तरी त्याचं कांहीं वाटलं नसतं मला; पण औपचारिक म्हणून कांहीं गोष्टी कराव्या लागतात माणसाला–अण्णांनीं त्याला सुद्धां नकार दिला. कादरची मंडळी मला आग्रह कर–करून आंबे, फणस, शहाळीं, दूध प्यायला लावीत अशा प्रत्येक वेळीं माझ्या मनांत येई—

" इतक्याच आपलेपणानं हीं माणसं माझ्या घरीं कधीं येतील कां?"

होय! तो प्रसंग नियतीनं एका काळरात्रीकरितां राखून ठेवला होता!

एकाच प्रसंगीं कादरला मी माझ्याकडे बोलाविण्याचं धाडस केलं न् अंतीं तें धाडसच ठरलं. काशीच्या लग्नांत खास माझं म्हणून त्याला पानसुपारीचं आमंत्रण दिलं होतं. बिचारा आला केव्हां न् गेला केव्हां, मला कळलं सुद्धां नाहीं.

कादर पानसुपारीला आला. फार शहाणा होता तो. सभेंत शिरला नाहीं. केवळ मला वाईट वाटेल म्हणून तो आला होता. विन्यानं त्याला मांडवाबाहेरच थांबविलं. पान-सुपारी, फूल, नारळ, अत्तर-गुलाब त्याच्या हातांत कोंबून विन्या जाऊं लागला.

" विनायक–रघु कुठं आहे ? "

" दादा आतांच बाहेर गेलारे. नारळ कमी पडले म्हणून गूळपेंडीला पाठविलं आहे त्याला अण्णांनीं. "

काय हें ! काय ही अजब थाप ! नारळ कमी पडले हें खरं होतं. पण मी आगरांत नारळ पाडीत होतों. काय बोलणार कादर यावर ! बिचारा आल्या पावलीं परत गेला.

कादरला पानसुपारी करून बाहेरच्या बाहेर परतविण्याची खास कामगिरी अण्णांनीं विन्याकडे सोपवली होती. असली कांहीं नाजूक कामगिरी विन्याकडे आली म्हणजे तो माझा सल्ला घेतल्याशिवाय हालचाल करीत नसे. पण त्या दिवशीं त्याला काय अवदसा आठवली कोण जाणे– ही कामगिरी त्यानं अल्लद पार पाडली. अण्णा–दादा यांची भर लग्नांत बोलणीं होऊन शोभा होण्यापेक्षां कादरची शोभा त्याला परवडली असावी ! जरा वेळानं विन्यानं सारा प्रकार जसा घडला तसा सांगितला.

माझ्या डोक्यावर घण बसूं लागले.

" कादर—काय वाटेल तुला ! "–मी स्वत:ला सारखं विचारीत होतों.

माजघरांत गेलों न् वळकटयांत डोकं खुपसून रडूं लागलों. मला हुंदके आवरेनात. कुठं मियां–कादर—कुठ मी ! लाज वाटत होती मला स्वतःची. माझे हुंदके ऐकून आत्या आली.

"कोण रे तें—? रडतांय कोण तिथं—?" आत्या अगदीं जवळ आली.

"हा रांडेच्या–रघ्या तूं कां ? अगदींच च्यवलास–अरे झालं काय भरल्या घरांत रडायला ?"

"आत्या तूं इथून जा–मला मनसोक्त रडूं दे."

"रघू–इकडे ये पाहूं–" त्या माऊलीनं मला अंगाशीं घेतलं.

"आधीं रडायचा थांब–अगदीं. काय झालं ? चावलं का कुणी ? तुला सांगितलं–जाऊं नको दुपारच्या वेळीं माडावर चढायला. भिक्या नव्हता का. पण ऐकायचं कुणी ?"

"आत्या इंगळी चावती तरी त्या वेदना सहन करायला परमेश्वरानं ताकद दिल्येग मला. पण दोन पायाची इंगळी डसली कीं नाहीं सहन होत."

"असं मोघम नको बोलूं. काय झालं नीट सांग पाहूं."

"आत्या, कादरला ढोरासारखं बाहेर लावून दिलं ग या लोकांनीं. मी काय त्याला सभेंत आणणार होतों ? मला अगोदर कळतं तर माडाच्या शेंड्यावरून खालीं उडी टाकली असती नी अण्णांच्या नाकावर टिच्चून—"

"रघू–रघू–रघू–आतां शोभा दाखवायची आहे का सगळयांना–सांग. गळयांत धोंड बांधून मी विहीरींत उडी टाकत्यें अगोदर. तूं म्हणतोयस तें सारं खरं आहे. असं नको होतं व्हायला. मला कां नाहीं सांगितलंस कादर यायचा होता तें ? मी केली असती सारी व्यवस्था गुपचूप—"

"आत्या, मला काय माहीत हीं माणसं सारी माणुसकी गुंडाळून खोटं बोलून वागणार आहेत—"

"अरे खरं–पण कादर नको तो गेला घरीं. व्हायचं तें होऊन गेलं. आतां वर आणखी शोभाच करून घ्यायची आहे का? तसं असलं तर बोलणं नाहीं माझं. पण लक्षांत ठेव, मी हयात आहे तोंवर तुम्हां बेंद्रयांची बेअब्रू होऊन देणार नाहीं मीं." करारी आवाजांत आत्या बोलली न् निर्जीव यंत्रासारखा मी कामाला लागलों.

कादरला काय वाटेल? त्याला कांहीं वाटलं नाहीं! कादरलाच काय पण त्याच्या घरच्या कुणालाच याचं कधीं काहीं वाटलं नाहीं. नित्याच्या सरावामुळं खोटं खरं भासूं लागतं. अण्णांचीं वागणूक खोटी होती. पण मियांना असल्या गोष्टी क्षुल्लक वाटत–नव्हे, अण्णा आपल्या धर्माप्रमाणं वागत आहेत असंच त्यांना वाटे. हिंदुधर्मदर्शन त्यांना भिक्षुकांच्या मध्यस्थीनं झालं होतं तेवढंच. पण मला ही गोष्ट सदैव खात असे––अजूनहि खाते कीं कादरच्या कुटुंबीयांनीं जो जिव्हाळा मला सतत दाखविला त्याची परतफेड आमच्याकडून कधींच झाली नाहीं. मियांनीं रोकड्या पैशाच्या रूपानं मला साह्य केलं त्यांतसुद्धां अण्णांना काळं बेरं दिसलं! यवन मदत करतो आहे! नक्की कुठं तरी पाणी मुरत असलं पाहिजे! खरोखरच माणसाला माणूस म्हणून किती अल्प मोल आहे! त्याचा धर्म, त्याचा पैसा, त्याची सत्ता, त्याचा दर्जा, त्याची जात! माणसाच्या या धनाकडे पाहून त्याला चांगला–वाईट ठरवायचं असतं!

* * *

: ८ :

मी नोकरीला लागल्यावर चार वर्षांनीं मला ट्रेनिंगची परवानगी मिळाली. परवानगीचा कागद घेऊन मी घरीं आलों. सचिंत बसलों होतों. पुण्यास ट्रेनिंग कॉलेजांत शिक्षण घ्यायचं खरं—पण महिना वीस रुपये आणायचे कोठून ? अण्णांजवळ विषय काढला. त्यांनीं थोडासा विचार केला न् ताडकन् सांगून टाकलं—

"अरे शिंचो—काळजी कसली करतो आहेस एवढी ? नाहीं ट्रेनिंग झालं तर काय एवढं बिघडतंय ! आँ ? आम्हीं काय संसार नाहीं केले ? पांच रुपयांपासून संसार केला आम्हीं—पांच ! आणि हल्लींचा राजा-राणी छाप संसार नव्हे. तीन बहिणींची नी दोन भावांचीं लग्नं उरकलीं ! गेले-मेले सगळे ! काय पाहयला राहयलंय तुम्हांला ? एवढं करून पैकरितां तोंड वेंगाडलं नाहीं कुठं. तुला चांगले दहा रुपये मिळताहेत-न् वर चिंता ! तुम्हीं हल्लींचीं पोरं रडायचं कशाकरितां एवढंच धुंडत असतां कां ? आणि हें पहा नशीब कुणाला सुटलं नाहीं. नशिबांत नसेल तर वाटेल तें केलंस तरी ट्रेनिंग होणार नाहीं न् असेल तर परमेश्वर रूप घेईल तुला मदत करायला—"

कशांत मन लागेना म्हणून उठलों आणि कादरकडे गेलों. मियांनीं मला पाहिलं आणि एकदम प्रश्न केला.

"ख्वा—तोंड असं कां दिसतं आहे तुझं आज ? नरम दिसत्ये तब्येत— ?"

माझी व्यथा त्यांना कळावी अशी माझी यत्किंचितहि इच्छा नव्हती.

" कांहीं नाहीं– तुम्हांला मी नेहमींच उतरलेला दिसतों. कादर कुठं आहे ? भेटला नाहीं मला तो दोन दिवसांत. "

" कादर भेटेल तुला. अगोदर काय झालं सांग. रोजच्यासारखा नाहीं दिसत तूं. डोळे पहा कसे खोल गेले आहेत. अण्णांचं–तुझं पुन्हां कांही झालं कां ? रघ्वा, साऱ्या साखरपेंडींत अण्णांसारखा पुण्यवान माणूस नाहीं मिळायचा रे. अशा माणसांचं न् तुझं भांडण झालेलं ऐकलं म्हणजे काय सांगूं तुला, काय होतं तें. नी भांडण होतं तें तरी आमच्यामुळंच नाहीं का ? वाईट नको वाटून घेऊं पण आतां आमच्याकडे यायचं बंद कर– निदान कमी कर. अण्णांचे आशीर्वाद माझ्या रघ्वाला मिळाले पाहिजेत–– न् माझ्याकडे आलास तर नाहीं मिळायचे ते–उलट तळमळेल त्यांचा जीव–"

" काय हें मिया ! कोठला विषय कुठं नेतां ? असं भलतं कांहीं नका बोलूं —"

शेवटीं सारा प्रकार मला सांगावा लागला ! आणि त्या रात्रीं घरीं निघालों तेव्हां पुण्यास जायचं निश्चित केलं होतं ! जमेल तेव्हां फेडण्याच्या अटीवर मियानीं मला पैसे देऊं केले होते ! परमेश्वर यवनाच्या रूपानं माझ्या मदतीला धांवला हा अण्णावर अक्षरश: सूड होता ! त्यांना हें कळलं तेव्हां त्यांनीं मला ऐकवलं––

" हें पहा, ( अण्णा मला नांवानं क्वचितच हांक मारीत असत ) किती झालं तरी हे मुसलमान लोक आहेत. जातीवर गेल्याशिवाय राह्यचे नाहींत. तूं मोठा झाला आहेस आतां, तेव्हां जास्त सांगायचं नाहीं मला; पण लक्षांत ठेव माझे शब्द. "

अण्णांच्या हयातीपर्यंत असे हे प्रसंग नेहमीच येत होते. कळस झाला म्हणजे लहानपणचा बंडखोर ' रघ्या ' उफाळून बाहेर येत असे. माझ्या लग्नाची गोष्ट ! त्यावेळची अण्णांची–माझी लढत केवळ कादरच्या चाणाक्ष-

पणामुळंच टळली. म्हातारीं माणसं असतात मोठीं धूर्त. उतार वयांत दृष्टी अधु होते; पण लांबचं पाहाण्याचा हव्यास मात्र अधिक होतो! माझ्या लग्नांत कादरचा प्रश्न उपस्थित झाल्याशिवाय राहणार नाहीं, हें अण्णांना मुली पाहाण्याचा अगोदरच उमगलं होतं! लग्न ठरलं तरी लग्नाला अजून पुष्कळ अवकाश होता. पण एव्हांपासूनच आईजवळ ते असा कांहीं त्रागा करूं लागले! शेवटीं एक दिवस आई मला म्हणाली—

"रघु–बाळ, मला थोडी अफू आणून दे! ह्यांचे तुझे खटके आतां नाहीं सहन होत मला. आपल्या घराची अब्रु बाहेर पडण्याअगोदर मला वर पोंचवा––"

"रखमाई, काय गों झालं?" आत्या देवघरांत माळ ओढीत बसली होती. आईचे शब्द तिला ऐकूं गेले.

"इकडं यावं आपण जरा–"

"कायरे रघुनाथा, काय चाललंय तुझं न् रखमेचं?"

आत्या बडबडतच देवघरांतून बाहेर आली.

"आत्या, काय आहे या घरांत माझी सत्ता तर माझं कांहीं चालायचं आहे? मी कांहीं एक बोलत नाहीं."

"हेंच–हेंच या दोघांचं बोलणं असतं नेहमींचं. तुम्ही दोघं असं म्हणत सुटलांत तर मग हें घर तरी कुणाचं? न् मेलं येऊन जाऊन ऐकवायचं कुणाला तर मला–"

"अगो, पण झालं काय? काय रे रघु काय झालं? रांडेच्यानों, नुसतं मोघम मोघम काय बोलतां––"

"आत्या, माझं लग्न व्हायचं आहे ना आतां–त्यांतलीं विघ्नं आहेत हीं—"

"मोघम नको–कसलीं विघ्नं?"

"तें मला तरी कुठं ठाऊक आहे. अण्णा आईजवळ कांहींतरी बोलले न् आई माझ्याजवळ अफू मागते."

" रखमाई, तुला शहाणी म्हणतें मी; पण हें बोलणं बरीक शहाण-पणाचं नाहीं. काय बोलला अण्णा तुझ्या जवळ ?"

" याच्या कादरवरून कांहींच्या बाहीच बडबडायचं होतं."

" बडबडायचं होतं म्हणजे काय समजूं मी ?"

" मुसलमानाची ये जा लग्नांत झालीं तर—"

" अण्णा चुकतोय इथं! मी बोलेन त्याच्याजवळ. त्याच्या ट्रेनिंगला म्हणावं दुसरं नाहीं आलं कोणी मदतीला. कादरचा बापच धावला त्यावेळीं. रघु, तुम्ही आतां गप्प बसा. मी बघत्यें कुठं कादरला येऊन देत नाहीं लग्नाला तें. पण बाटवाबाटवी नाहीं करायची. सभेच्या बाजूला चांगली गादी घालून ठेवूं. कादर न् अबदुल तेली दोघांना बोलाव."

आत्या ! आत्या ! कुठं पैदा केलंस एवढं थोर हृदय ! तुझ्याइतकीच माणसाची कदर अण्णांना असती तर ... ?

शक्य नाहीं तें ! रघु, भलत्याच अपेक्षा अण्णांकडून करूं नको. पस्तावण्याची वेळ येईल. आतां याची शहानिशा करून घे.

मी तडक अण्णांकडे गेलों ! इडप्याशीं बसून त्यांची आवृत्ती चालली होती.

" अण्णा —!" अण्णांनीं मान वर केली.

" हं काय ?"

" माझं लग्न ठरलं आतां."

" बरं मग ? गुळपेंडीकडील कांहीं चिठ्ठी–चपाटी आली नाहीं ना ? मुहूर्ताचं ठरवायचं आहे—"

" मुहूर्त ठरण्याअगोदर एक ठरविलं पाहिजे–"

" कशासंबंधीं ?"

" कादरसंबंधीं."

" कादरसंबंधीं ?" अण्णांना विस्मयाचा धक्का बसला.

" होय, कादरसंबंधीं ! माझ्या लग्नांत कादरचा उपमर्द झालेला मला खपणार नाहीं–अगोदर सांगून ठेवतों. काशीच्या लग्नांत त्याची

शोभा झाली तेवढी पुरे आहे."

"हें पाहा, असं तेढं बोलूं नको. काय झालं म्हणजे तूं उपमर्द समजणार आहेस? कळूं दे तरी मला एकदां. टोकणा म्हणून मिरवायचं आहे का त्याला? नाहीं—कळूं दे; म्हणजे देवदक मला ठेवतां येईल कीं नाहीं तें ठरवायला बरं-"

"तेवढीं वेळ नाहीं आणून देणार. माझं लग्नच झालं नाहीं म्हणजे देवदकाचा प्रश्न तुम्हांला सोडवायला नको ना? कादरला वाळींत टाकल्यासारखं तुम्हांला जर वागवायचं असेल तर अगोदर सांगा. माझ्या लग्नापेक्षां कादरच्या प्रतिष्ठेची कदर मला अधिक आहे."

"प्रतिष्ठा, प्रतिष्ठा काय चालवलं आहेस? शुद्धीवर आहेस कां बोलतांना? ब्राह्मणाचा पोर तूं–चौऱ्यांयशी लक्ष योनींतून एकदां हा पवित्र जन्म येत असतो; आणि हीं दळभद्रीं लक्षणं कुठलीं आवडलीं तुला? विचार कर, विचार कर, रघुनाथा जरा. दशग्रंथी ब्राह्मणाचं आपलं घराणं–मला सुद्धां कळतं तुझा मित्र आहे तो; पण त्याचबरोबर बेन्द्र्यांच्या कुळांत जन्म घेतला आहेस हेंही लक्षांत ठेवलं पाहिजे. संसारांत सारीं धोरणं सांभाळावीं लागतात बाबा. मी जर असं एकच धरून बसलो असतों तर संसार पार नसता पडला."

"तुम्हीं सारं म्हणतां तें पटतं—"

"पटायचंच—"

"पण कादरचे—माझे आजवरचे संबंधच असे आहेत कीं त्याच्या बाबतींत तें लागू पडणार नाहीं.

"मग काय लागू पडणार आहे?"

"मी सांगेन तसं कादरला वागवायची तुमची तयारी आहे का? नाहींपेक्षां माझं लग्न रद्द करून टाका."

"बस्स कर, बस्स कर रघ्या. कुणापुढं बोलतो आहेस? थर्ड इअर ट्रेन्ड झालास म्हणजे काय बालीष्टर झालास? तुझ्या अण्णाल

तिरडीवर बांध न् बंदरावर ने. मग या खुशाल घरांत—मुसलमान आण नाहींतर मटण शिजव. एवढा विझवटा असशील असं वाटलं नव्हतं मला-- "

आई कोपऱ्यांतून सारं ऐकत होती. तिचे डोळे लाल झाले होते. मी तिरस्कारानं अण्णांकडे पाहात होतों. अण्णा तार तार उठले न् टापशी बांधून बाहेर पडले.

ते गेले ते सरळ अबदुल मियांकडे. तेथें त्यांनीं काय सांगितलं माहीत नाहीं; पण ऐन माझ्या लग्नाच्यावेळीं कोणाचीशी तार आली; आणि कादर कोठल्याशा आजारी नातेवाईकाला भेटायला म्हणून बाहेर-गांवीं गेला ! माझ्या लग्नांत त्याला जातीनं हजर राहतां आलं नाहीं म्हणून अण्णांसकट सर्वांना फार वाईट वाटलं ! लग्नाच्या दिवशीं कादरचं भलं थोरलं पत्र मला आलं. लग्नाला न येऊं शकल्यामुळं त्याला फार फार वाईट वाटलं होतं ! सोबत त्यानं अहेरादाखल पंचवीस रुपये पाठविले होते.

कांहीं गोष्टी माणसाच्या मनाला लागून राहतात. त्याचे वळ केव्हांही बुजत नाहींत. सोवळं ओवळं आमच्या आचारांत केव्हां न् कोणी घुसडलं न कळे, पण आम्हांला लागलेला तो शाप आहे एवढं खरं. या पायीं माणुसकीला पारखे झालों आम्हीं. सारी संस्कृति 'शिवूं नको' या दोन शब्दांत जखडून टाकली---विटाळसे झालों. हिंदुधर्माच्या समतेच्या तत्त्व-ज्ञानाची विटंबना करून देवघराच्या टीचभर जागेंत त्याला कोणी कोंडून ठेवलं असेल, तर या सोवळ्या—ओवळ्यानं.

* * *

: १ :

माझ्या लग्नानंतर चार महिन्यांनीं कादरचं लग्न झालं. मियांचे आप्त इरफान कमाल यांच्या मध्यस्थीनं हें लग्न ठरलं होतं. अनुरूप सून, अनुरूप बायको मिळणं हा एक जुगार असतो. मियांसाहेब न् कादर यांनीं हा जुगार पूर्णपणें जिंकला होता. हसीनेचं सौंदर्य अस्सल मुसलमानी थाटाचं होतं. गोरीपान, सरळ नाक, शेवग्याच्या शेंगेसारखा सडपातळ बांधा–हसीनेला प्रथम पाहिलं तेव्हां कळलं मला मुसलमान स्त्रिया पडदा कां बाळगतात ! गोरीं माणसं मला आवडत नाहींत. मी काळा आहें म्हणून कदाचित् असेल ! गोरं माणूस म्हटलं म्हणजे तें आपल्याच डौलांत असतं–मग नाकाकडून त्याचं सौंदर्य साफ बसलं असलं तरी त्याला फिकीर नसते, असा माझा बरेच दिवसांपासूनचा ग्रह होता. कादरच्या घरांत त्याचं लग्न झाल्यावरहि मी पूर्वीसारखाच वावरत असें, पण भाभीशीं बोलायचं मी नेहमीं टाळायचों. कोणाला आवडतं–न आवडतं. साध्या बोलण्यांत लघळपणा पाहाणाऱ्या स्त्रियाहि असतात. भाभी तशी नव्हती. कांहीं काळानंतर माझं मलाच आश्चर्य वाटायचं–इतक्या सौजन्यशील स्त्रीशीं मी इतक्या भिडेनं कां वागलों.

कादरचं लग्न फार थाटांत झालं. कादरची सासुरवाडी श्रीमंत होती. ' मुलगा पाहून ' त्यांनीं हा संबंध मान्य केला होता. लग्नांत पैसा उधळतांना त्यांनीं कुठंच कसूर केली नाहीं. आमच्यासारखी शिवाशिवीची भानगड त्यांच्यांत नव्हती. त्यामुळं कोणा नातेवाईकाला आजारी पाडून

गांवाबाहेर पळ काढण्याची पाळी माझ्यावर आली नाहीं! मधूनच माझ्या लग्नाच्या वेळीं झालेल्या तमाशाची आठवण होई न् मन बेचैन होई एवढंच.

लग्नाचे आदले दोन दिवस गाण्याच्या मैफली झाल्या. कादरच्या श्वशुरांनीं मुंबईहून खास गवई या कार्यक्रमाकरितां आणले होते. लग्नाच्या दिवशीं कादर सजून तयार झाला. आम्हीं सर्व मशिदींत गेलों. मेंबरच्या बाजूला पेशमाम उभा राहिला न् त्याच्याजवळ कादर उभा राहून त्यांची प्रार्थना सुरूं झाली. तेथल्या त्या मेळाव्यांत मी एकटा हिंदु होतों. माझं लग्न मला आठवत होतं! त्या साऱ्याच लग्नसोहळ्यांत माझ्या लग्नाची मला घडीघडी आठवण होत होती. लग्नाला जाऊं द्याच—गांवांत सुद्धां आम्हीं राहूं दिलं नाहीं कादरला त्या दिवशीं! समारंभाच्या पावित्र्याचा भंग झाला असता!

मशिदींतून आम्हीं लग्नमंडपांत परत आलों. कादरला मी पन्नास रुपयांचा अहेर केला. मियांनीं माझी सर्वांशीं ओळख करून दिली. ती सारीच मंडळी प्रथमपासून माझ्याकडे टकमक पाहात होती. लग्नानंतर आठवड्यानं मी मियांकडे गेलों. खुषींत होते मियां.

"रघ्या, इकडे ये."

"काय?"

"तूं फार श्रीमंत झाला आहेस!"

"हृदयानं मी कधींच गरीब नव्हतों——मियां!"

"पैशानं म्हणतों आहे. टाळूं नको विषय, अरे अहेराला कांहीं सीमा आहे कीं नाहीं? कां व्याजाचे पैसे घेणार नाहीं म्हणून असे पोंचते केलेस? तुमचं बामणांचं डोकं कसं चालेल कळायचं नाहीं."

"मियां, व्याजाची कल्पना डोक्यांत आणून तुमच्या प्रेमाला बाजारांत ओढण्याइतका मी नादान झालों असं वाटलं तरी कसं तुम्हांला?"

"किती लावून घेतां तुम्हीं पोरं? तुमची थट्टा करायची सुद्धां भीती वाटते."

" मग काय बोलूं–तुम्ही बोललांतच असं—"

" तसं नाहीं रे. कालच्या अहेरांत तुझ्याएवढा अहेर कुणाचाच नव्हता म्हणून गंमत केली तुझी. "

" याचा एकच अर्थ शक्य आहे. काल जमलेल्या लोकांत माझ्या-एवढं कादरवर कुणाचंच प्रेम नसावं ! "

" हसीनाबानूचं सुद्धां ? "

" तिनं तर हृदय अर्पण केलं कादरला. तिची–माझी तुलना करून कसं चालेल मियां ? "

लहान मुलासारखे मियां हसूं लागले.

* * *

## : १० :

कादरनं इंग्रजी शिकावं, साऱ्या रत्नागिरी जिल्ह्यांत त्याचं नांव व्हावं.---मियांच्या जीवनांतील ती एक ज्वलंत महत्त्वाकांक्षा होती. ज्या दिवशीं त्यांना कळून चुकलं, यापुढं कादरचं शिक्षण अशक्य आहे, त्या दिवशीं त्यांना मनस्वी दुःख झालं. कादर सातवींत गेल्यापासून मियांनीं अंथरूण धरलं तें तब्बल वर्षभर. वडिलोपार्जित दमा त्यांना होताच! यानंतर ते दुखण्यांतून उठले तरी निकामी झाले.

एकोणीसशें अठ्ठावीस सालीं पुण्याहून मी ट्रेंड होऊन आलों. कादर त्यावेळीं तेलाची घाणी चालवीत होता! मियांची आर्थिक स्थिति कांहीं वाईट नव्हती---तरीपण ते स्वतः हिंडतेफिरते झाल्याशिवाय कादरनं चालता धंदा सोडून शिक्षणांत गुंतून घेणं अव्यवहार्य होतं. आतां त्याचं वयहि शिक्षणाचं राहिलं नव्हतं. कादर तेवीस वर्षांचा झाल्यावरही त्याच्या शिक्षणाची उमेद मियांनीं बाळगली ती केवळ त्याच्या बुद्धिमत्तेकडे डोळे लावून. हळहळायचे ते. पण परिस्थितीपुढं कोणाचाच इलाज नव्हता. पुढील शिक्षण कादरच्या नशिबांत नव्हतं हेंच खरं. माझ्या आयुष्यांत एक काळ असा होऊन गेला--त्या काळांत यश म्हटलं म्हणजे कष्ट-धडपड-लढा-योजना या चारच गोष्टी मी जाणत होतों. कष्ट, धडपड, लढा, योजना-ठीक आहे सारं हें; पण या साऱ्याची वजावाट करून सुद्धां कांहीं तरी बाकी उरतेच-त्याला नशीब म्हणा, नाहींतर आणखी कांहीं म्हणा. कादरच्या नशिबांत इंग्रजी नव्हतं! काय म्हणायचं दुसरं! मी ट्रेंड होऊन

परत येईपर्यंत मियां–परिस्थिति यांचा झगडा अविरत चालू होता. आणि अशा या परिस्थितींत कादरच्या श्वशुरांकडून एक दिवस पत्र आलं—

७८६

इब्राहिम मैनशन, दादर मेन रोड.
१७ ऑगस्ट, १९३०

चं. कादरसाहेब यांस वडिलांचे कडोन दुवा–अनेक आसिर्वाद,

पत्रास कारण कीं इलाहिकृपेनं आम्हीं सर्व सुखरुप आहोंत. काळजी नसावी. अब्बाजानच्या परकृतीला आम्हीं पाठविलेल्या औषधानं आराम पडला हेंही वाचलें आणि यामुळेंहि आनंद झाला. दमा कमी आहे समजोन औषध बंद करूं नये. विशेषतः जें चाटण पाठविलें आहे तें सकाळ संध्याकाळ असें सहा महिने द्यावें. आमच्या हकीमांचें म्हणणें आहे कीं दमा साफ थांबलाच पाहिजे. आमचा हा मजकोर मियांसाहेबांस मुद्दाम सांगावा. आपण शहाणे आहात तेव्हां अधिक लिहायला नको. हसिनाबानूस खेडेगांवांत राह्यची संवय नाहीं, म्हणून कंटाळली असेल. तिला सांगावें पुढच्या महिन्यांत आम्हीं तिकडे नक्की येत आहोंत. तुमच्या सावित्रीचें वर्णन हसिनाबानूनें केलें तें वाचलें. तुमची ही लाडकी नदी पण पावसाळयांत कशी दिसत्ये पाह्यचें आहे. तेव्हां आम्हीं पुढच्या महिन्यांत नक्की येत आहों. या महिन्यांतच आलों असतों, पण सध्यां एका महत्त्वाच्या कामांत आम्हीं आहोंत. दादर भागांत आम्हीं एक दुकान खोलायचा विचार करीत आहों. नशिबानं तुम्हांला पण तेलाच्या धंद्याचा अनुभव आहे. तेव्हां दादरच्या दुकानाची सारी व्यवस्था तुमच्या ताब्यांत देण्याची आमची इच्छा आहे. हसिनाबानूलासुद्धां मुंबई पुष्कळ आवडत्ये. तेव्हां आपण येण्याचें जरूर करावें. दिवाळीला आपण इकडे आलांत तरी चालेल. तोपर्यंत मियांच्या प्रकृतीला पण चांगला आराम पडेल, तुम्हीं यालच असें आम्हीं समजतों. तेलाच्या धंद्याला चांगली तेजी आहे. तेव्हां या कामांत आम्हीं असल्यामुळं या महिन्यांत तिकडे यायला जमणार नाहीं. पुढच्या महिन्यांत जरूर येतों,

असें हसिनाबानूस सांगावें. ती एकटी फारसी कुठं राहिली नाहीं. तेव्हां आपण तिची काळजी घ्यावी. आपण घेतच असाल. पण मी तिचा बाप आहे, त्यामुळं लिहावेंसें वाटतें. पुढच्या महिन्यांत मी तिकडे आल्यावर आपण अधिक बोलूं. दर्जेप्रमाणं सलाम–आसिर्वाद. आ.

मुस्ताफा अहंमद गांधी

" कादर, संधि आली कीं दोन्ही हातांनीं पकडणं हें यशाचं रहस्य आहे. तूं विद्वान व्हावंस अशी बुद्धिमत्ता तुला परमेश्वरानं दिली आहे; पण जें शक्य नाहीं त्या करितां रडण्यापेक्षां जें चालून येत आहे त्याचं मनापासून स्वागत कर. माझी खात्री आहे तूं तिथं सुद्धां आपला प्रभाव दाखवशील."

" सारं पटतं रे रघु, पण अब्बाजानची प्रकृति पाहिलीस ना?"

" खरं आहे थोडंसं तूं म्हणतोस तें; पण असं पहा–एकतर मियांची प्रकृति आतां सुधारत्ये–न् आतां ती सुधारतच जाणार आहे. शिवाय मी नाहीं का इथं?"

" किती ठिकाणीं लक्ष देणार आहेस तूं? आणि अब्बाजान काय म्हणतात माहीत आहे कां?"

" काय?"

" कांहीं नाहीं रे. कादरचं काय ऐकतोस तूं?"

" पण बोललांत काय तुम्ही? कांहीं तरी विशेष दिसतंय. कायरे कादर तूंच सांग—"

" अब्बाजान म्हणतात तुझ्या अण्णांना आवडत नाहीं तेव्हां तुला आमच्याकडे कमी यायला सांगायचं—"

" मियांसाहेब–हें दुसऱ्यांदा माझ्या कानावर येतं आहे. अण्णांचं नांव सांगतां कीं तुमचीच इच्छा आहे—"

" पाह्यलंस, पाह्यलंस कादर, तुला मी सांगितलं होतं. तरी माहीत आहे तुला रघ्याचा स्वभाव. एकदम डोक्यांत राख घालायची संवय आहे त्याला."

" मग कसं बोलायचं मियां ? मला तर वाटूं लागलं आहे अण्णांचं नुसतं नांव आहे—"

" रघ्या, तुझी माफी मागूं कां ? सहज म्हटलं कादर जवळ न् काय बोलतो आहेस तूं हें ?"

" मी रागावलों नाहीं—पण माझा स्वभाव तुम्हांला माहीत आहे. वडील माणसांचं मन राखावं असं मलाहि वाटतं. पण स्वतःचं मन मरणार नाहीं इकडेहि मला लक्ष दिलं पाहिजे. माझ्या पुरती मी मर्यादा घालून घेतली आहे. त्याच्यापुढं जाऊन कुणाच्याहि मनाचे लाड मी पुरविणार नाहीं. कादरच्या संगतीनं माझं कल्याणच झालं आहे—पण अण्णांना तें आवडलं नाहीं. तुम्हीं ट्रेनिंगच्या वेळीं परमेश्वरासारखे उभे राहिलांत-म्हणून काय अण्णांच्या मनांत फरक पडला आहे ? आम्ही तरुण मंडळींनीं किती वाकावं असं तुमचं म्हणणं आहे ? अनेक वेळां तुम्हीं मला हें ऐकवीत असतां. पण शेवट सांगतों माझ्या वागणुकींत फरक पडायचा नाहीं. ज्या दिवशीं तुम्हीं धक्के मारून--"

" बस्स कर, बस्स कर. तूं फार बोलूं लागलास. तुझं काय म्हणणं ? कादरनं मुंबईला जावं—तूं माझी काळजी घ्यायला इथं आहेस ? कादर आतां एक शब्द नको यावर. मुंबईस जाण्याचा बेत कायम झाला !"

न् दुसऱ्या दिवशीं कादरनं मुस्ताफा साहेबांना पत्र घातलं सुद्धां !

इथपासून पुढं कादर मुंबईला जाईपर्यंत मियांच्या घरांत एकच विषय चालू होता--' कादर मुंबईकर होणार !'

त्यावर्षीच्या नारळी पौर्णिमेला मी नी कादर सावित्रीला नारळ द्यायला गेलों होतों. श्रावणांत सावित्रीचं सौंदर्य नेहमींच अफाट असतं.

कादरची बायको सावित्रीचा रुबाब पाहून खूष झाली यांत नवलाचं कांहीं एक नाहीं.

पिऱ्याच्या डोंगराला तिनं घेतलेला तो वळसा—सर्पाच्या नागमोडी चालींतील सारं लालित्य तिथं पाह्यला मिळतं. यानंतर महापुरुषाच्या डोहांत ती उडी घेते न् पुन्हां अकस्मात प्रगट होऊन आपल्या प्रियकराकडे धांव घेते. तें सारंच दृश्य कोणाही कलावंताला जागच्या जागीं उभं करील असं आहे. श्रावणांत पूर आला म्हणजे तांबड्या पाण्याचे लोळच्या लोळ पिऱ्याच्या डोंगरांतून बाहेर पडत असतात. उन्हाळ्यांत भिकार दिसणारं सावित्रीच पात्र महानदीचं रूप धारण करतं. अशा वेळीं भरती असावी. मग काय विचारतां ? साखरपेंडीचे आबालवृद्ध सावित्रीचं तें तांडवनृत्य पाह्यला काठावर जमतात. सागराच्या लाटांचा रेटा न् सावित्रीचा प्रक्षुब्ध प्रवाह यांचं भयंकर द्वंद्व सुरू होतं. फेसाळत कारंजासारखे उडणारं जलतुषार स्वर्गलोकाकडे धांव घेत असतात. हाडामांसाच्या माणसासारखं साऱ्यांचं सावित्रीवर प्रेम आहे.

उस्मान खलाशाला गाठा न् सावित्रीचा विषय काढा. नाहीं आवरायचा तुम्हांला तो. लहानपणापासून त्यानं अनुभविलेल्या सावित्री-कथा तुम्हांला तो ऐकवील. जन्मभर सावित्रीनं त्याला व्यवसाय पुरविला. सावित्रीविषयीं कांहींहीं बोलणं निघालं तरी त्याच्या वृद्ध नेत्रांतून कृतज्ञतेचे अश्रु उभे राहतात. असं सांगतात कीं ‘ महापुरुषीय ’ कालांत सावित्रीचं पात्र अतिविशाल न् खोल होतं. मराठ्यांचा नाविक तळहि तिथं होता. साखरपेंडीच्या अनेक कथांप्रमाणंच ही सुद्धां किती विश्वसनीय आहे—सांगतां येत नाहीं. मात्र सावित्रीचं पात्र दिवसें दिवस उथळ होत आहे यांत कसलाहि संशय नाहीं. पण ही वस्तुस्थिति उस्मानला सांगून पहावी ! तो त्याचा जोरानं निषेध करील. सावित्री चंद्रसूर्याइतकीच अजर आणि अमर आहे, अशी त्याची दृढ श्रद्धा आहे. कशानंहि त्या श्रद्धेंत बदल व्हायचा नाहीं.

दोघेहि हजर राहिलों अशी कादरच्या आणि माझ्या आयुष्यांतील ती शेवटची नारळीपौर्णिमा असावी. त्यादिवशीं सावित्री नेहमीसारखीच नटली होती. तिच्या लाटा नेहमींच्यासारख्याच फुगड्या घालीत होत्या. सारे लोक नारळ देऊन गेले तरी कादर तेथून हलेना.

" कादर, आज विचार काय आहे तुझा ? सावित्री आपला साज दोन दिवस तरी उतरेल असं दिसत नाहीं. तितका वेळ इथं उभं राह्यचा विचार आहे का तुझा ? "

" रघु, तुला तरी हलावंसं वाटतं कां इथून ? काय हा रुबाब-पहा तरी. महापुरुषाच्या घोरणी दृष्टीचे अनेक प्रकार आपण साखरपेंडीला पाहातों, पण सावित्रीमाईच्या कुशींत त्यानं साखरपेंडीची स्थापना केली याच्यासारखं मला कशाचंच कौतुक वाटत नाहीं. शिवाजीच्या काळांत काय थाट असेल रे हिचा ? "

" बघायला सुद्धां तयार नसेल आपल्यासारख्या पामरांकडे ! " मी हंसत बोललों.

" नाहीं रे रघु—ओळखलं नाहींस सावित्रीला. परमेश्वर सर्वशक्तिमान आहे म्हणून काय त्याच्या लेकरांना दूर लोटतो ? सावित्रीचा एक लौकिक माहीत आहे तुला ? "

" काय ? "

" सावित्रीनं एकाहि जीवाचा बळी आजवर घेतलेला नाहीं."

" ऐकतों आपण हें—पण खरं असेल कां ? सावित्रीच्या भक्तांनीं पसरविलेली ही एक दंतकथा असावी असं मला वाटतं. "

" रघु--मला वाटलं नव्हतं तूं एवढा नास्तिक असशील असं. "

" बरं, बरं, तूं चल घरीं आतां. तुझा उस्मान होत चालला आहे ! "

आणि जायचा दिवस आला. तीन वाजतां मी गाडी घेऊन कादरकडे गेलों. पिऱ्याच्या घाटींतून हर्णैला जायचं होतं. मियांच्या घराशीं गाडी

उभी केली. मियां बाहेर गाडीशीं आले. मिस्कीलपणानं गाडीचं निरीक्षण करीत होते ते.

" अरे रघ्बा. गाडींत पेंढा घातला आहेस कीं गाद्या पसरल्या आहेस ? "

" मुंबईची व्हिक्टोरिया फिक्की पडली पाहिजे, मियां. नाहींतर हे साहेब मुंबईला गेल्यावर शिकवायला लागतील—आमची मुंबई अशी आहे न् तशी आहे. "

" बरोबर आहे-बरोबर आहे ! अरे आपली साखरपेंडीं ती साखर-पेंडी ! तो पुष्कळ ऐकवील. रघ्बा घाटींतून जायचा बेत उगीच केला आहे तुम्हीं. सरळ खाडीवरून पलीकडे व्हायचं ते तुमचं एकेक कांहींतरीच. "

" मियां, कादर हा. त्याला वाटतंय आपण विलायतला चाललों आहों ! सगळी साखरपेंडी त्याला पोटभर पाहून घ्यायच्ये-पिऱ्याची घाटीं-सुद्धां त्यांतून सुटतां उपयोगी नाहीं ! "

" विनाकारण दोन तास अगोदर निघावं लागणार आहे, दुसरं कांहीं नाहीं रे. बरं, निघा आतां. काल बोट नऊला बंदरांत आली होती माहीत आहेना— "

" रघु– तुला एक विचारूं—" विचित्र आवाजांत कादरनं मला प्रश्न केला.

" काय ? "

" तुझ्या अण्णांना सांगून यावं असं माझ्या मनांत फार होतं; पण तुला विचारल्याशिवाय उगाच नको म्हणून आलों नाहीं तुझ्याकडे. आवडेल ना त्यांना ? "

" गेलंच पाहिजे का ? कदाचित त्यांना बरंहि वाटेल. पिऱ्याच्या घाटींतून आपण जाणार हें त्यांना कळलं तेव्हां त्यांनींच एवढे पेंढे अंथरां-यला सांगितलं. तुझी फारच इच्छा असली तर ... पण नको ! कांहीं जाऊं नको. मी सांगेन तूं येणार होतास त्यांना भेटायला म्हणून. माझा

अंदाज चुकून कांहीं भलतंच त्यांतून निघालं तर माझ्या लग्नासारखी गत व्हायची-- ''

'' लग्नासारखी कसली रे गत व्हायची रघ्या-? '' मियांनीं सात्त्विक संतापानं मला विचारलं.

'' जाऊ दे ना मियां- ''

'' जाऊं दे नाहीं.—माझी बोट आज चुकली तरी चालेल; पण हा विषय तू काढलाच आहेस रघु, तर मी तो आतां अधांतरी ठेवू देणार नाहीं. अण्णांबद्दल तुला कांहीं वाटो—पण तुझ्या लग्नाला मी आलों नाहीं याकरितां तूं त्यांना जबाबदार धरणार असशील तर मात्र त्यांना तो अन्यायच होईल. ''

'' त्या बाबतींत मला कांहींहि वाटलं म्हणून मला त्यांचेविषयीं आदर नाहीं असा अर्थ तूं करतोस का ? ''

'' तसं नसेल कदाचित्--पण या बाबतींतसुद्धां तुझा रोष असणं हें सुद्धां अण्णांना अन्याय करणारं आहे-- ''

'' रोष जरूर असणार ! मी तुकाराम नाहीं झालों. मला त्याची खंतहि वाटत नाहीं. ''

'' हाच अन्याय तूं करीत आहेस. तुला काय वाटतं अण्णांनीं सांगितल्यावरून मी गांव सोडून गेलों ? तसं असलं तर तें धादांत खोटं आहे. त्या दिवशीं मी थक्क झालों—खुद्द अण्णा तुझ्या लग्नाचं आमंत्रण द्यायला आले म्हणून ! आमच्याकरितां खास व्यवस्था करण्याचंहि त्यांनीं ठरवलं होतं. फक्त एकच भीक—त्यांच्या शब्दांत सांगतों आहे—एकच भीक त्यांनीं मागितली. ' बाटवाबाटवी करूं नका ! ' मग त्याकरितां रघूचं मन मोडावं लागलं तरी हरकत नाहीं. अण्णांसारखा सत्पुरुष आमच्याजवळ भीक मागत होता ! कल्पना कर रघु, आम्हांला काय वाटलं असेल तें. देव-धर्म काय तुला-मलाच आहे न् अण्णांना नाहीं ?

काय बिघडलं त्यांनीं असं सांगितलं तर? शेवटीं मी नी अब्बाजान दोघांनीं हा मार्ग पत्करायचं ठरवलं- -काय चुकलं यांत अण्णांचं बोल?"

"तूं सांगतो आहेस हें सारं खरं कशावरून? तुम्हां तिघांवाचून खरा प्रकार कोणालाच माहीत नाहीं—"

"कुराणाची कसम खाऊन सांगितलं तर विश्वास बसेल कीं नाहीं तुझा—" इतकं रागावून बोललेल मियांना मी कधीं पाहिलं नव्हतं.

"नको—नको मियां. पटली खात्री माझी—"

महापुरुषाच्या वडाकडे आम्हीं पाहिलं—अण्णा झपाझप पावलं टाकीत येत होते!!

"ते पहा—रघु, पाहा त्या सत्पुरुषाकडे. अल्लाचा हा शुभशकुन आहे कादरला."

अण्णा जवळ आले!

"कादर—वांकून नमस्कार कर अण्णांना. घे त्यांचे आशीर्वाद आणि जा मुंबईला!"

शुद्ध हिंदु थाटांत कादरनं अण्णांना नमस्कार केला! अण्णासुद्धां गहिंवरले.

"पुरे, पुरे बाळ. महापुरुषाचा आशीर्वाद घे. मंगल होईल तुझं!"

घरांतील पेंड संपली होती ती येतांना इथूनच मला आणायला सांगण्याकरितां अण्णा आले होते. जणूं निरोप पाठवून ते आले कादरचा नमस्कार घ्यायला!

आणि थोड्याच अवकाशांत आमची गाडी महापुरुषाच्या वडाला मागं टाकून चौखुर उधळली. गाडी दिसेनाशी होईतों मियां भुकेल्या दृष्टीनं आमच्याकडे पाहात होते. साखरपेंडी आम्ही झपाझप मागं टाकीत होतों.

"रघु—सावित्रीच्या पुलावरून गाडी घे. महापुरुषाला पैसा-सुपारी द्यायची आहे. माहीत आहेना?"

"कादर, तूं डोळ्यांतून पाणी आणायचं बाकी ठेवलं आहेस. जरा बाप्यासारखा वाग—"

"तुला नाहीं कळायचं हें दुःख—साखरपेंडी सोडायलाच पाहिजे त्याकरितां—"

"अरे, पण जन्माची का सोडतो आहेस ? सहा महिन्यांनीं पुन्हां येशील—"

"होय–पण आतां आलों तरी दोन दिवसांचा पाहुणा—"

"त्यांतच मजा आहे बाबा. प्रेमाची किंमत विरहाशिवाय कळत नाहीं."

आम्हीं पुलाशीं आलों. कादर उतरला. त्यानं डोहांत पैसा-सुपारी टाकली. आमची गाडी चालूं झाली.

"काय रे, हा शेरल्लीं हल्लीं मोटरीच्या धंद्यांत पडला आहे कां ?"

"त्याची कुठली आठवण झाली तुला कादर ?"

"मोटरी धुवायला आला आहे पाहा—"

"कुठं ?"

"तो पाहा–उभा आहे तिकडे. लपणारा माणूस नव्हे तो !"

"साडेसाती आहे साखरपेंडीची ही रघु."

पिऱ्याची घाटी उलटून, गुळपेंडी मागं टाकून आमची गाडी हर्णै बंदराच्या वाटेला लागली होती. दूर अंतरावर भव्य जंजिरा समुद्रांत उभा होता. शिवकालांत हा जंजिरा आणि सावित्रीचा परिसर भंडारी गड्यांच्या शौर्यानं पुनीत झालेला आहे. कादर सारं पोटभर पाहून घेत होता. त्याला बोलायलाहि अवसर नव्हता.

"अरे कादर, बोल ना कांहीं तरी–"

"हं—"

"अरे हं काय–? तूं तर अगदीं सासरीं निघालेल्या सुनेसारखं करतो आहेस–"

" रघु, बरोबर उपमा दिलीस. कोकण म्हणजे माहेरच आहे आपलं. हे उघडे बोडके कोळी, किनाऱ्यावर उपड्या-उताण्या पडलेल्या त्यांच्या होड्या —वाळत घातलेलं हें म्हावरं, सारं मला पोटभर पाहून घेऊं दे. आणखी सहा महिने तरी पाह्यला नाहीं मिळणार. "

तासाभरानं आम्ही हर्णैच्या भुइकोट किल्ल्याशीं आलों. एथून वीस मिनिटांच्या अंतरावर धक्क्याला सुरुवात होते. धक्का समुद्रांत सरळ गेलेला आहे. टोकाला पडाव लावण्याकरितां समुद्रांत कट्टा बांधलेला आहे. कट्ट्याच्या एका बाजूला ओबड धोबड उंच खडकावर हर्णैचा प्रसिद्ध शुभ्र दीपस्तंभ आहे. भुइकोटापासून धक्क्यापर्यंतचा लाल धुळीचा रस्ता सुरूंच्या दुतर्फा झाडींतून गेला आहे. सुरूंच्या दोऱ्यांतून सों--ऽ ऽ करीत समुद्रावरचं वारं सोसावत असतं. भुइकोटाशीं आलं कीं बंदर आलंच.

या सुरूंच्या रस्त्यावर वर्दळ दांडगी असते. बोटीची वेळ झाली कीं खेड, दापोली, साखरपेंडी या बाजूंनीं मोटारीची नुसती रीघ लागून राहाते. लाल धुरळा उधळीत मोटरी सारख्या येत जात असतात.

आमची गाडी धर्मशाळेशीं आली. हाशम खलाशाला 'एक मुंबई' काढायला सांगून आम्हीं पुढं निघालों.

" कादर, गर्दी फार दिसत्ये आज बोटीला. ही धर्मशाळा पाहा, भरून गेल्ये."

" न् गाडी काय आली आहे पाहा बंदरांत- ए रघु, अरे सावकास, सावकास जरा. वाटेल तशी गाडी पिटायला ही पाज नव्हे. महाद्या पाहातो आहे पाहा कसा तुझ्याकडे. गाडी पुढं काढतांना धक्का दिलास त्याच्या गाडीला--"

" काय व म्हादु-? "

" रघु दादा-गरिबाची गाडी मोडायच्ये व्हय ? "

" मोटारशीं कॉंपिटीशन करणारी तुझी गाडी मोडत्येय होय ? "

आम्हीं धक्क्याशीं आलों तेव्हां काळोख चांगला झाला होता. साऱ्या पुळणीवर जिकडे तिकडे गाडया सुटल्या होत्या. धक्क्यावरच्या गॅसच्या बत्तीनं तेथला काळोख उठून दिसत होता !

"रत्नागिरी जाणार—रत्नागिरी जाणार !" म्हणून खलाशी धक्क्याकडे चालले होते. 'टपाल लाईन' यायची वेळ झाली होती. रत्नागिरी–मुंबईला जाणाऱ्या प्रवाशांची काळोखांतून चाललेली धांवपळ, सोबत आलेल्या मंडळींची गडबड, घो ऽ ऽ करीत किनाऱ्यावर गुंडाळत येणाऱ्या लाटा,—त्या वातावरणांतील हा सारा संमिश्र कल्लोळ अविस्मरणीय असतो.

धक्क्याशीं मी गाडी सोडली. हाशमजवळ सामान देऊन चहा प्यायला घोंडबाच्या हाटेलांत आलों.

चहा घेऊन आम्हीं निघालों. आणि पडावाच्या कट्ट्याशीं बत्तीखालच्या एका दगडावर जाऊन बसलों. अजून दोन तास तरी थांबायला लागणार होतं.

"काय घाई अब्बाजानची विनाकारण, नाहीं रघु ? आणखी तासभर तरी साखरपेंडीला राह्यला मिळालं असतं आपल्याला—"

"बापाचं प्रेम आहे बाबा तें—"

"आतां अब्बाजान जेऊन बसले असतील, नाहीं रघु ?"

"हो, न् तुझ्याप्रमाणंच तेही तुझ्या आठवणी काढीत असतील."

समुद्राची एक लाट खडकावर जोरानं आदळून त्याचं पाणी थेट आम्हीं बसलों होतों तिथं आलं. दर्यांत लांब अंतरावर चंद्रावतीचा दिवा लुकलुकूं लागला. टपाल लाईन बंदरांत उभी होती. मुंबईहून आलेले प्रवासी, मुंबईला जाणारे प्रवासी, पुन्हां मघांची गडबड—गोंधळ सुरु झाला. सामानानं गच्च भरलेले टेले खलाशी पडावांत रचीत होते. पडावांत सुद्धां चांगली जागा मिळावी म्हणून पुढं पुढं धडपडणारे लोक पडावांत जांत होते ! खलाशी त्यांना दम देत होते—

——आणि चंद्रावती आतां चांगलीं पुढं आली. विद्युद्दीपांनीं सजलेलं तें तिमजली जहाज पुढं सरकत होतं. कादर साश्रु नयनांनीं पडावांत जाऊन बसला. पडाव सुटला ! बोटीनं खळ्-खळ्-खळ्-खळ्–खडाट् करून नांगर टाकला. साखरपेंडीपर्यंत ऐकूं जाणारा तिच्या भोंग्याचा आवाज झाला.

'चल्लॉव–चॉल–चल्लॉव–चॉल' करीत पडाव अजगरासारखा पुढं चालला. दीपस्तंभाचा दिवा आतां आमच्या पिच्छाडीला आला. पडाव बोटीला लागला. कादर बोटींत चढला न् जड मनानं मी मागं आलों.

कादर मुंबईला पोंचल्यावर आठ दिवसांनीं त्याचं मला पत्र आलं.

७८६

इब्राहिम मॅनशन्, दादर मेन रोड.

२९ ऑक्टोबर, १९३०.

मित्र रघुनाथ यास सप्रेम नमस्कार—

पत्राची सुरवात मुसलमानी थाटांत करून तुला नमस्कार लिहिला आणि क्षणभर थाबलों ! विसंगत तर खरंच, पण आपल्या स्नेहाचं यापेक्षां समर्पक प्रतीक तें कोणतं असूं शकेल ? आपल्या साखरपेंडीला हिंदु–मुसलमान संस्कृती सख्या बहिणीसारख्या हातांत हात घालून वावरत असतात. दादुमियाचा पीर, महापुरुष, सावित्रीमाता, तुमची दुर्गादेवी हीं साखरपेंडीचीं दैवतं तरी कोणता संदेश देतात ? या पूजास्थानांच्या रांगेला तितक्याच सन्मानानं आपलं सौहार्दही नांदू शकेल यांत मला तरी संशय वाटत नाहीं.

इथं येऊन मला आठवडा झाला; पण रघु, अजूनहि एथल्या वातावरणाशीं मी समरस होऊं शकत नाहीं रे. सकाळीं यंत्रासारखे सारे कामाला लागतात; मी आमच्या आगरांतील शिंपण्याचा विचार करीत बसतों !

—झुंजुमुंजु झालं आहे. ढवळ्या रहाटाला फिरत आहे. ऑं ऽ ऽ ऍं ऽ ऽ उँ ऽ ऽ ऑं ऽ ऽ. रहाटाचं तें गोड संगीत माझ्या कानांत घुमत

आहे. रहाटाचं संगीत गोड असतं हा शोध मला मुंबईला आल्यावर लागला आहे ! असे अनेक शोध मला लागले आहेत रघु.

उस्माननं तरींतून आपल्याला अनेकवार पलीकडे नेलं आहे. तरीचं शीड सोडतांना होणारा आवाज–टर्रर्र. परवां ग्यालरींत बसलों होतों न् त्याचीच आठवण सहज मला झाली; न् मग खाडीवरची सारी वर्दळ एका मागून एक आठवूं लागली. त्या 'टर्रर' आवाजानं मला वेडं केलं पहा. हंसशील हें सारं वाचून. तुला नाहीं पटायचं. वासुदेवशास्त्र्यांनीं 'पोटासाटीं भटकत जरी....' हें काव्य लिहिलं. आपण तें शाळेंत शिकलों; पण त्याचं मर्म मात्र मला आज समजलं–! न् तुला तर तें अजूनही समजणार नाहीं.

रघु, खरोखर प्रेम हें एक अद्भुत रसायन आहे. या रसायनापायीं सावित्रीमाई चालती बोलती होते, महापुरुषाचा वड आपल्या श्रांत मनाला शांत करतो, पिऱ्याचा डोंगर आपल्या पाठीवर प्रेमळ हात फिरवितो. साऱ्या वस्तुमात्रांत जीवन निर्माण होतं.

पोंक्ष्यांनीं आपल्याला 'एकच प्याला' वाचायला दिलं होतं. तें वाचल्यामुळं कांहींतरी काव्यमय मी लिहीत आहें असं तुला वाटेल. पण तसं नाहीं. मीं एवढा मजकूर लिहिला न् एकदां वाचला. माझा मला अचंबा वाटूं लागला. जसं आलं तसं लिहिलं–पण पत्र किती सुंदर साधलं आहे ! कां साधणार नाहीं–मी म्हणतों कां साधणार नाहीं ? माणूस जर प्रेम करूं शकेल तर त्याला लेखक बनणं फारसं कठीण पडत नसावं. भावनांनीं मन ओसंडूं लागल्यावर त्यांना बंदिस्त करायला शब्द गुलामासारखे राबणं अशक्य आहे कां ?

रघु, कित्येक वेळां मी असा वेड्यासारखा ग्यालरींत विचार करीत बसतों––

आतां कर्र–कर्र वहाणा वाजवीत आमच्या रघूची धिप्पाड मूर्ति शाळेचा रस्ता चालत असेल. ते पाहा अब्बाजान–घाणीशीं येऊन मला सांगत आहेत–

'उंड्यांचा फार नाश करतोस तूं–असा नाहीं धंदा व्हायचा.'

इतक्यांत 'मियांचा रघ्बा' आला. मियां त्याला विचारीत आहेत.

'काय रे रघ्बा–या वेळेला इकडे कुठं ? रजा काढल्येस वाटतं शाळेत ?'

'छे हो मियां–म्हाताऱ्यानं निरोप दिला तुम्हांला तेल आजच पाहिजे संध्याकाळीं. तें सांगायला आलोंय.'

'म्हातारा म्हणजे अण्णा कीं काय रघ्बा ? थट्टेत बोलला असशील; पण निदान मला तरी नको पुन्हां ऐकवूं असं. अण्णांसारख्या पुण्यवान माणसाबद्दल–'

'पुन्हां बोलणार नाहीं मियां.' न् रघ्बा शाळेची वाट चालूं लागला.

अब्बाजान त्याच्या वाटेकडे पहात होते.

'काय गुणी आहे पोरगं,' ते पुटपुटले.

––आता संध्याकाळ झाली आहे. मी घाणीशीं रेंगाळतोय. अजून बऱ्याच उंड्या संपायच्या आहेत. अब्बाजान आले.

'कादर, शाळा सुटायची वेळ झाली. रघ्बा आतां येईल तेल न्यायला. तेल राहील बाजूला न् गप्पानं वेळ काढाल. अण्णा ओरडतील–रघ्बा ओरडेल. नकोच तें. ठेवून दे बाकीच्या उंड्या. आधीं तेल घे बेलींत न् पळ अण्णांकडे'

तेल घेऊन मी जायला निघालों. अब्बाजान कवाडीशीं धांवत आले.

'कादर, ए कादर, अरे संभाळून बोल अण्णांशीं. तेल कमी आहे म्हणतील. नुसता हांस, बोलूं नको, म्हणजे नेतील ते आंत.'

रघु, अशा एक ना दोन किती आठवणी सांगू ? जरा एकटा असलों कीं साखरपेंडी दिसूं लागते–आतां अमका अमका काय करीत असेल ! कित्येक वेळां मला वाटतं ही मंडळी मला वेड्यांत तर जमा नाहीं करणार !

आजचं माझं पत्रं भारुडानंच भरलं आहे; आतां जरा 'हलकं' वाटतं आहे. यापुढचीं पत्रं व्यवस्थित येतील. काळजी करूं नको !

तेलाची घाणी लवकरच सुरू होईल. पाहूंया कसं काय जमतं तें.

लिहितां लिहितां मी विसरत होतों-मुंबईत हल्लीं धमाल आहे. पकडा पकडी, लाठीमार, मिरवणुका, प्रभातफेऱ्या! साखरपेंडीच्या सत्याग्रहावरून मुंबईच्या सत्याग्रहाचा अंदाज बांधण्यांत अर्थ नाहीं. आपली तट्टाणी होती- इथं ऐरावत आहे. गांधींबद्दल फार मोठा माणूस यापलीकडे मला माहीत नाहीं; पण एका टीचभर माणसाच्या शब्दाखातर एवढे लोक धडाधड तुरुंगांत जातात, लाठ्या खातात- विचार करायला लावणारी ही वस्तुस्थिति आहे यांत संशय नाहीं. अधिक पुढील पत्रांत--

तुझा स्नेहांकित

कादर

* * *

## : ११ :

——यानंतर कादरचं आयुष्य बदललं तें कायमचं. मनुष्य मुंबईस गेला म्हणजे त्याच्यांत आमूलाग्र फरक घडून येतो. त्याचा बावळा वेष बदलतो, आरोग्य बिघडतं आणि मन बंडखोर बनतं. हे सगळे फरक मला कादरमध्यें पाह्यला मिळाले. एकोणीसशें तीसच्या आक्टोबरमध्यें कादर मुंबईस गेला नी एकतीसच्या एप्रिलमध्यें चार दिवसांच्या सवडीनं साखरपेंडीस आला होता.

या सहा महिन्यांत शामळू दिसणारा कादर अस्सल मुंबईकर झाला होता. त्यानं लांब बाल ठेवले. मनगटावरच्या घड्याळाशिवाय तो वेळ बघेना कीं, फाऊंटन पेनशिवाय लिहीना ! वाकडं तोंड करीत पोटावर हात फिरवितांना कादरला आजवर मी कधीं पाहिलं नव्हतं—हें एक नवीनच शिकून आला तो मुंबईहून ! गरे जास्त खाल्ल्यामुळें पोट दुखतंय म्हणून तो आमच्याजवळ तक्रार करूं लागला. मला तर हंसूच कोसळलं ! विनोद नाहीं तर काय ? त्याच्या वेषांत पडलेला फरक तर या साऱ्यापेक्षां विस्मयकारक होता.

बोटीवर त्याला आणायला मी गेलों होतों. शुभ्र खादीचा लेंगा, नेहरू शर्ट-जाकीट, वर गांधी टोपी अशा थाटानं तो बोटींतून पडावांत पाय टाकीत होता. बोटींत डोकावून मी पाहात होतों. माझ्या हातांत द्यायला त्यानं बॅग पुढं केली तेव्हां मी चमकून पाहिलं; न् मला समजलं—तो कादर होता ! जातांना गोंडेदार टोपी तो घालून गेला होता ! पडावांतून

उतरून आम्हीं धक्क्यावर आलों. बंदरावर चहा घेतला. गाडी जुंपली. बोजे गाडींत भरले. गाडी पुळणीवरून बाहेर पडूं लागली—

या अवधींत कादरची सारखी बडबड चालू होती. मुंबईस गेलेला कादर आणि हा कादर यांत जमीनअस्मानाचा फरक होता. साखरपेंडीला असलेल्या कादरला हिंदुस्थानवर राज्य कोणाचं चालूं आहे याचा पत्ता जेमतेम होता. परत आलेला कादर ब्रिटिशांची सत्ता उलथून पाडण्याच्या गोष्टी करीत होता! साखरपेंडीच्या कादरला गांधी–नेहरू कोण होते माहीत नव्हतं; परत आलेला कादर त्यांचे तेजस्वी संदेश मला ऐकवीत होता! साखरपेडीच्या कादरला कॉंग्रेस माहीत नव्हती; परत आलेला कादर कॉंग्रेसकरितां देहार्पण केलं पाहिजे असलं प्रतिपादन आग्रहानं करीत होता. मला हें सारं नवीन होतं. वर्तमानपत्रं आम्हीं वाचायचों. असहकार, करबंदी यांचे प्रतिध्वनी साखरपेंडीला उमटले; पण अखेर-पावेतों ते प्रतिध्वनीच राह्यले. माझ्या प्रकृतीच्या माणसाला तर गांधी-जींचें सत्याग्रह तत्त्वज्ञान कधीं ग्रहण झालं नाहीं; अजूनही झालेल नाहीं. आत्मशक्ती-उपोषण-मार न देतां मार खाणं–कशा पटणार या कल्पना रघु बेंद्रेला! तीसच्या संग्रामांत साखरपेंडीला लहानशा प्रमाणावर सत्याग्रह झाला. कांहीं लोकांना अटक झाली 'ह्यो नाटकाचा म्होरचा खेळ ह्योच थ्येट्रांत ह्योच मंडळी सुटून आल्यावर पुन्हां करून दावशाल!' अशी टिंगल या सत्याग्रहाची मी स्वत: केली होती. आणि कादर तर बोटींतून उतरल्यापासून कॉंग्रेस, गांधी आणि चळवळ यांच्याशिवाय कांहीं बोलेना! मी थोडासा बुचकळ्यांत पडलों–आपण ही जी टिंगल करतों ती खरोखरच अनुचित आहे कीं काय?

खुद्द त्याच्या दादरलाच एक प्रचंड मिरवणूक निघाली आणि साहेबाच्या पुतळ्याला 'जिवंत' जाळण्यांत आलं. स्टेशनसमोरच्या पटांग-णांत दादरकरांची सभा भरली होती. कादर प्रामुख्यानं त्या सभेत वावरत होता. अकस्मात् पोलीसांची टोळधाड येऊन जोराचा लाठीमार झाला,

त्या लाठीमारांत त्याच्या मानेवर बसलेला मार–त्याचं बँडेज त्यानं अजूनहि सोडलं नव्हतं. केवढ्या अभिमानानं त्यानं तें बँडेज मला दाखविलं !

फुटक्या टेंभ्याशीं आमची गाडी झाली. आम्हीं पुळणींतून पाजेच्या रस्त्याला लागलों. पाऊण तास त्याचं बोलणं मी ऐकत होतों. सरदार पटेल–पंडित मालवीय-क्रुकशँक रोड–झेविअर कॉलेज–पंडितजींचा कोर्टांतील तडफदार प्रतिकार-एक ना दोन ! कंटाळलों शेवटीं मी. हा प्राणी साखरपेंडीचं कांहीं विचारीना, मियांसंबंधीं कांहीं विचारीना. माझी जुनी बैलजोडी विकून नवी घेतली होती. साखरपेंडीहून निघालों तेव्हां दापोलीला जाऊन बैलजोडीचा सौदा कसा केला ते कादरला सांगायचं मी ठरवलं होतं ! पण हा प्राणी विचारील तेव्हांना––याचं तिसरंच ! मला राग आला त्याचा.

" कादर इतका कसा एककल्ली झालास तूं ? "

" कां रघु ? आवडत नाहीं तुला हा विषय ? माझ्या परिस्थितींतून तूं गेला असतास तर तुझही डोकं असंच फिरलं असतं. मुंबईला या दिवसांत एकदां येऊन जा— कळेल तुला महात्म्याची किमया. आझाद मैदानावर झेंडा रोवायला निघालेल्या त्या शीख जवानाची गोष्ट तूं नुसती ऐकलीस–– "

"त्यापूर्वी साखरपेंडीचं थोडंसं मी ऐकवणार आहे तुला. साखरपेंडी पण लागते तुझी कोणीतरी––" कादरला हंसू आलं.

" सांग, सांग. मी येतों आहे रे साखरपेंडीवर. "

" केव्हां ? आतां सावित्रीची खाडी आली कीं साखरपेंडीच ! "

" अरे होय पण रघु—एवढं काय झालं ? "

" कांहीं झालं नाहीं. मला फार वाटत होतं, बोटीतून उतरल्यावर मियांची चौकशी करशील, आंबे–फणस कसे आहेत विचारशील. तुमचा विहीरीपासचा फणस किती लागला आहे माहीत आहे तुला ? "

" खरंच ? "

" मी ही नवीन जोडी खरेदी केली—पांवडा पाहिलास जोडीचा ?"

" अरेच्या ! खरंच कीं ! जुनी जोडी केव्हां विकलीस ? "

" कांही विचारूं नको आतां— "

" बरं—आतां मुंबईचं एक अक्षरही बोलणार नाहीं घरी जाईपर्यंत. उद्यां मात्र तुला घरीं यावं लागेल नुसतं मी काय सांगतों तें ऐकायला. रघु, बलिदानाशिवाय मुक्तता नाहीं. रक्ताची धार ज्यावेळीं आपण या कार्याला अर्पण करूं त्याचवेळीं आपली सुटका होईल. "

" पुन्हां तेंच तुझं ! कादर, मी जरूर टाळ्या देतों; पण आतां हा विषय पुरे कर. कंटाळलों मी. "

एकवीस ऑक्टोबरला कादर मुंबईला गेला. त्यानंतर पांचच दिवसांनीं—सव्वीस ऑक्टोबरला तो मुंबई पाह्यला बाहेर पडला. आझाद मैदानाशीं आला तेव्हांचं तेथलं दृश्य सराईत मुंबईकरांना थरारून टाकणारं होतं. निःशस्त्र स्वयंसेवक तिरंगी झेंडा घेऊन मैदानांत घुसण्याचा निष्फळ प्रयत्न करीत होते. शिपायांच्या बेताल लाठ्याखालीं ते जायबंदी होऊन खालीं आदळत. तात्काळ त्यांची जागा दुसरे स्वयंसेवक भरून काढीत. त्या वेळचं त्या शीख गड्याचं शौर्य—कादर विरघळून गेला तें दृश्य पाहून. मला ती हकीकत सांगतांनासुद्धां त्याचं ऊर भरून आलं. त्या शिखाची मूठ पिंजायची वेळ आली तरी पकड ढिली पडेना.

कशाकरितां ? एकाच प्रश्नाचा विचार कादर करूं लागला. त्या प्रश्नाचं उत्तर कादरला मिळालं. त्या दिवशीं कादर बदलला ! त्याच्या मनाची स्थितिमानता गेली—कायमची गेली. तो होता तसाच राहाता तर आमच्या आयुष्यांतील कितीतरी कटु घटना कदाचित् टळल्या असत्या !

पुढच्याच वर्षी मे महिन्यांत मुंबईला त्याच्याकडे मी गेलों होतों.

अवघ्या दीड वर्षांत त्यानं धंद्यांत मिळवलेलं यश कौतुकास्पद होतं. त्याच्या श्वशुरांनीं त्याच्यावर टाकलेला विश्वास मुळींच अस्थानीं नव्हता. ज्या प्रभावानं कादर शाळेंत चमकला त्याच प्रभावानं तो धंद्यांतही चमकला. मुंबईला येतांना त्याला मी हेंच सांगितलं होतं. पण मनांत मी पूर्णपणें

साशंक होतों ! जन्माचा अबोल प्राणी हा--काय धंद्यांत करणार ? असंच मला वाटत होतं. तो एवढा बोलका कसा झाला याचंच मला राहून राहून आश्चर्य वाटत होतं. दुकानांत गिऱ्हाईकांशीं तो बोलू लागला म्हणजे लहानपणीं पाहिलेली मियांची हंसरी मूर्ति आठवे. अण्णांबरोबरची त्यांची हुज्जत माझ्यासमोर उभी राही. त्याच्या नाकाची न् जिव्हणीची ठेवण हुबेहुब मियांसारखी होती. खालीं वांकून तो हसूं लागला कीं मियां आहेत कीं कादर आहे असा संशय यावा इतकं त्या दोघांच्यांत साम्य होतं. दुकानांत बसून मी कादरकडे नुसता पाहात राहयचों. तास न् तास मजेंत जायचे. नाना वृत्तीचीं गिऱ्हाईकं यायचीं. कुणालाहि न दुखवितां आपल्या पदरीं असलेला माल त्यांच्या पदरीं फायदा मिळवून बांधायचा ! केवढी कला असली पाहिजे ! मी कादरला म्हटलं—

" कादर, आतां तूं यशस्वी धंदेवाला झाला आहेस, तेव्हां सांगायला हरकत नाहीं. इकडे आलास तेव्हां एवढं यश मिळेल असं मुळींच वाटत नव्हतं. एवढा बोलका झालास कसा बुवा ? "

" तुला जें वाटत होतं तेंच मलाही वाटत होतं रघु. एक नंबरचा अबोल प्राणी मी. अभ्यासाशिवाय दुसऱ्या कुठं पाहिलं नाहीं आयुष्यांत. पण पाण्यांत पडलं ना कीं इच्छा असेल तर पोहाला येतं. पाणी जातं तोंडांत पण पोहाला शिकतो माणूस. तुलासुद्धां ओढणार आहे यांत ! "

" नको रे बाबा, माफ कर. "

" माफ कर काय ? साखरपेंडींत काय ठेवलंय ? मी जर एवढं यश मिळवलं, तर तुझ्यासारखा बडबड्या, लटपट्या काय करणार नाहीं या जगांत ? मी ठरवून टाकलंय आणखी वर्षभरानं तूं इकडे आला नाहींस तर पोत्यांत भरून आणायचं तुला. पोतं वहिनींच्या डोक्यावर देईन म्हणजे झालं. आपण दोघांनीं एके ठिकाणीं काम करावं अशी माझी फार इच्छा आहे."

" बात करूं नको अगदीं. आमची हयात साखरपेंडींत जायची न् मसणविदींतूनच आम्हीं स्मशानांत जायचे. "

घंदेवाला म्हणून स्वतंत्र म्हणतात--पण कसली ती स्वतंत्रता ! कादरची घाई पाहून विटून जाई मी. पैसा काय चाटायचाय-मला वाटे. त्यांत आणखी कॉंग्रेसचीं कामं तो चोरूनमारून करी. कॉंग्रेस त्या दिवसांत बेकायदा संस्था झाली होती. कसलंही बारीक काम करायचं तरी तारेवरची कसरत होती. कॉंग्रेस बुलेटीन्सची देवाण घेवाण कित्येक वेळां त्याच्या दुकानामार्फत होई. हें फार वाईट होतं. निदान मला तरी मंजूर नव्हतं. मी एक दिवस त्याला स्पष्ट सांगितलं--

" कादर, असलीं कामं करतांना तुला तुरुंगवास भोगावा लागला तरी मला अभिमान वाटेल-साऱ्यांना अभिमान वाटेल. पण दुकानची जागा असल्या कामांकरितां तूं वापरणं हें व्यवहाराला सोडून होत आहे. उद्यां पोलीसांना सुगावा लागून त्यांनीं दुकानाला टाळं ठोकलं तर कोणत्या तोंडानं तूं मुस्तफासाहेबांकडे जाणार आहेस कळूं दे मला. तुझ्याकडे कादर म्हणून पाहात असतील त्यापेक्षां कितीतरी अधिक हसिनेचा नवरा म्हणून ते पाहात असतील. "

कादरनं जरा विचार केला.

" पटतं रघु तूं काय म्हणतोस तें. "

न् तेव्हांपासून दुकानाशीं या कामाचा कोणताही संबंध त्यानं ठेवला नाहीं. एकोणीसशें पसतीस सालापर्यंत त्याचं कॉंग्रेस-कार्य बरंच चालूं होतं. त्यानंतर त्याच्या धंद्याचाच व्याप इतका वाढला कीं दुसऱ्या कुठंही लक्ष देणं त्याला अशक्य झालं. कॉंग्रेसचा एखादा फंड निघाला कीं लठ्ठसा आंकडा आपल्या नांवापुढं तो टाकी. एवढाच त्याचा न् कॉंग्रेसचा संबंध राहिला.

* * *

# : १२ :

मियां आतां एक सुखवस्तु गृहस्थ झाले. आजवर त्यांनीं दुःख असं फारसं पाहिलं नव्हतंच. दोन पैसेहि बाळगून होते. तीन सालीं ते आजारी पडले तेव्हां मात्र त्यांची गृहस्थिति थोडीशी डबघाईस आल्यासारखी झाली. कादर मुंबईस न जाता तर ती आणखी बरीच बिघडली असती. पुण्यात्म्यांचा पाठराखेपणा परमेश्वर क्वचितच करतांना दिसतो! मियांच्या बाबतींत त्यानं पुष्कळच लक्ष ठेवल म्हटलं पाहिजे. कादर मुंबईला गेला न् त्याची सारखी भरभराट होत गेली. पसतीसच्या सुमारास मियां अक्षरशः कार्यनिवृत्त झाले.

पिढ्यान् पिढ्या चालत आलेली त्यांची घाणी आतां बंद झाली. फक्त यात्रेंत देवीला मानाचं जें तेल द्यावं लागे तेवढंच ते आपल्या घाणीवर गाळीत. तें सुद्धां बाजारी द्यायला हरकत नव्हती; पण माणसाच्या भावना कांहीं विलक्षण असतात. आपलं घर सुखी व्हायला ज्या अनेक गोष्टी कारण झाल्या त्यांत या ‘ मानाच्या तेलाला ’ फार मोठं श्रेय आहे अशी त्यांची दृढ श्रद्धा होती. सकाळचं शिपण्याचं काम आणि हें वार्षिक तेल गाळण्याचं काम सोडलं तर आतां त्यांच्या ढवळ्याला पूर्ण विश्रांति होती. ‘ फुकटचं खायला घालायचं तें काम घ्या त्याच्याकडून करून ’ असं त्यांना कोणी सांगितलं तर त्यांना तें पटत नसे.

“ खाऊं द्या–खाऊं–द्या. त्याच्या पुण्याईचा पण भाग आहे आमच्या सोन्याच्या दिवसांत ” ते म्हणत.

मियांचं हृदय डोंगराएवढं होतं. आपल्या भाग्यकालाला प्रत्येक संबंधित सजीव-निर्जीव वस्तु कारणीभूत आहे, असं त्यांना वाटे. देवीचं मानाचं तेल, 'पायगुणा'चा रघ्या, ढवळ्या बैल-एक ना दोन!

एकेचाळीसच्या एप्रिलला आमच्या छोटूचा जन्म झाला. कादर-मियांनीं बारशाला उडविलेला थाट अजूनहि लोकांच्या स्मरणांत आहे. यात्रेच्या नवव्या दिवशीं छोटूचं बारसं होतं. नऊही दिवसांत मियां देवीच्या देवळापुढचे तीन दगडी त्रिपूर दिवल्यांनीं भरून टाकीत. ते उंचच्या उंच त्रिपूर जळत्या स्तंभासारखे दिसत लांबून. यात्रेला येणारा प्रत्येक इसम स्तिमित होऊन जाई तें भव्य दृश्य पाहून. मियां भेटेल त्याला विचारीत—

"अरे, तुमच्या देवळापासचें त्रिपूर पाहिलेस का? नाहीं? पाहून ये, तुमच्या रघुदादांना नवसाचा मुलगा झाला. त्याकरतां सजवले आहेत त्रिपूर."

मला वाटलं—

"आज अण्णांना कळेल, साखरपेंडीला कळेल—मियाचं माझं काय नातं आहे तें."

तसं पाहिलं तर कादरचंही लग्न माझ्याबरोबरच झालं. त्याला अजूनही कांहीं मुलबाळ नव्हतं. अशा स्थितींत मला मुलगा झाला म्हणून मियांना उत्साह–एवढा उत्साह वाटायचं वास्तविक कारण नव्हतं. तसा न वाटता तर त्यांना मी फारसा दोष दिला नसता. मियां झाले तरी माणूसच होते. पण मियां क्षुद्र नव्हते. 'रघ्बा' सुद्धां त्यांचाच होता!

कादर बारशाकरितां चार दिवसांची सवड काढून मुद्दाम आला होता. सोन्याचे दागिने, बाबा गाडी, नाना तऱ्हेचे उंची कपडे, आई, आत्या, छोटूची आई, या सर्वांकरितां लुगडीं, अण्णांकरितां जरीकांठीं उप-रणं—जवळ जवळ पांचशें रुपये फस्त केले त्यानं बारशाकरितां. कादरकडून छोटूला आलेल्या त्या उंची देणग्या पाहून माझ्या नातेवाईकाचे डोळे

फाटून गेले ! आतां माझी स्थिति पुष्कळ सुधारली होती, तरीपण आम्हीं 'उच्च गरीब वर्गीयच' होतों. असला झगझगाट आम्हांला कोठचा पाह्यला मिळणार ? कादर आतां चांगला सधन झालेला होता. छोटूच्या बारशाला तो असला कांहीं तरी थाट उडवून देणार याची कल्पना मला होती. सर्वांत आनंदाची कांहीं गोष्ट असेल तर अण्णांनीं कादरला आमच्याकडे बारशाकरितां जातीनं बोलावणं केलं.

"अरे रघुनाथा, कादरला बोलवायला हवं ना ?"

"बोलावलं तर दुधांत साखर पडेल. पण नाहीं बोलावलं तर तो बारशानंतर येऊन जाईल केव्हां तरी."

"बारशानंतर कसं चालेल बाबा ? आजचा सोन्याचा दिवस हा. मलाच जाऊन येऊं दे. तूं आळसावारी नेशील नी वेळ टळून जाईल." एवढं म्हणून अण्णा बाहेर पडले ! कवाडीपर्यंत ते गेले न् परत फिरले.

"रघु, तो रडतोय कां पहा जरा. सूनबाईला सांग त्याला टाकून कुठं जायचं नाहीं." अण्णा निघाले ! कादरला बारशाचं बोलावणं करायला निघाले !

कादर जातीनं सारा आहेर घेऊन आला होता. त्याच्या मांडीवर मी छोटूला ठेवलं. त्यानं त्याचा प्रेमभरानं पापा घेतला ! होय ! कादरनं पापा घेतला; नी अण्णांना त्याचं फारसं कांहीं वाटलं नाहीं ! आमच्या घराहून निघतांना कादर म्हणालासुद्धां—

"रघु–तुझ्या लग्नाच्या वेळीं जी उणीव तुला भासली ती आज पुरेपूर भरून निघाली आहे. तुझ्या मनांत अजूनही कांहीं रुखरुख शिल्लक असेल तर काढून टाक आतां."

मी काय बोलणार ? तें सारंच दृश्य पाहून माझं हृदय भरून आलं होतं.

छोटूच्या बारशाचा समारंभ आटोपला. नंतर एक दोन दिवसांनीं मी मियांकडे पांचशे रुपये घेऊन गेलों. महिना तीन चार रुपये

मागं टाकून ही पुंजी मी गेल्या दहा वर्षांत उभी केली होती. मियांनीं माझ्या ट्रेनिंगसाठीं आयत्या वेळीं मदत केली. त्यांच्या पडत्या काळांत त्यांनीं ही मदत केली होती. हजारों रुपये आजच्या परिस्थितींत कादरनं मला देऊं केले असते तरी त्या पांचशेंची सर त्याला नव्हती. मियांकडे गेलों न् त्यांच्या पुढं शंभराच्या पांच नोटा ठेवल्या. मियांनीं एकवार त्या नोटांकडे पाहिलं; एकवार माझ्याकडे पाहिलं.

" रघ्वा, छान केलंस ! कर्ज ठेवूं नये कोणाचं. आतां असं पाहा— तुझ्या छोटूला माझं असं मीं कांही दिलं नाहीं. तेव्हां पांचशें रुपये माझे म्हणून त्याला मी देत आहें. माझी एकच अट आहे. हे पैसे पोस्टात ठेव न् फक्त त्याच्याकरतांच खर्च कर. "

त्या वृद्ध माणसाच्या प्रेमाला मी कुठवर थोंपविणार ? नाहीं होय म्हणणं म्हणजे उपमर्द होता त्यांच्या भावनेचा. मुकाटपणें त्या नोटा मी खिशांत घातल्या.

* * *

## : १३ :

आमच्या या दोन सुखी कुटुंबांवर परमेश्वरानं आतां पूर्ण कृपादृष्टि टाकली होती जणूं ! एकेचाळीसच्या मे महिन्यांत आमचा छोटू झाला, नू पुढच्या वर्षी ऑगष्ट महिन्यांत कादरला मुलगा झाला. पंधरा दिवसांची रजा काढून मी मुद्दाम मुंबईस गेलों होतों. या सगळ्या कंत्राटांत माझे दोनशें रुपये उडाले. आयुष्यांत कर्ज मी दोनदां काढलं. एकदां ट्रेनिंगच्या वेळीं मियांकडून आणि या वेळेला कादरच्या छोकऱ्याच्या बारशानिमित्त. यावेळचं कर्ज मी छोटूच्या पोस्टांतील पांचशें रुपयांतून काढलं होतं ! ‘ अनृणी राहा ’ असं अण्णांचं नेहमीं सांगणं असे. हे दोन प्रसंग वगळले तर तें व्रत मी जन्मभर पाळलं.

मी मुंबईला आलों तो भर धमालींत. नऊ ऑगस्टला मी दादरला आलों. रविवार होता त्या दिवशीं. दुसऱ्याच दिवशीं सकाळीं कादरच्या दुकानांत जायला म्हणून बाहेर पडलों. शंकराचा पूल ओलांडून मामा काणेच्या हाटेलाशीं आलों. तेथल्या नाक्यावर लोकांनीं मोठी होळी पेटवली होती. काय भानगड आहे, माझ्या लक्ष्यांत येईना. मी तसाच पुढं मारुतीच्या देवळाशीं गेलों. तेथल्या चौकांत ब्रिटीश सोजीरांनीं सांखळी केली होती. पुढं जाणं शक्य नव्हतं. मागं वळलों आणि स्टेशनच्या बाजूनं कोहिनूर सिनेमाकडे जाऊं लागलों. एक अजस्र लॉरी जळत होती. मधूनच लोकांची धांवाधांव होई. स्टेशनच्या नाक्यावरून सोल्जर लोक लेडी जमशेटजी रोडवर मारुतीच्या देवळाकडे धांवत जातांना दिसले. तिथं जाणं

धोक्याचं होतं. सोल्जरलोक केव्हां गोळीबार करतील नेम नव्हता. टिळक पुलावरून मी प्लाझा सिनेमाकडे वळलों.—हरीनिवासजवळ कादरची तेलाची वखार होती. तिकडे जाणं वेडेपणाचं होतं. पण मी विचार केला— ' हा प्रकार साखरपेंडीला कुठं पाहयला मिळणार आहे ? ' मी तसाच पुढं चालूं लागलों. प्लाझा सिनेमा टाकून पुढं झालों न् नंतर पाह्यला मिळालेला देखावा भयानक होता. माझ्यासारखा सराईत मारामारी करणारा माणूससुद्धां भेदरून गेला तें दृश्य पाहून. कोहिनूर मिलजवळ एक दुमजली बस जळत होती. मवाली लोक मोठमोठीं झाडं, पिपं, दगड आणून रस्त्यावर रचीत होते. पलीकडेच सरकारी धान्य दुकान लुटलं जात होतं.

" महात्मा गांधी कीं जय ! "

" जवाहरलाल नेहरू कीं जय ! "

" करेंगे या मरेंगे ! "

अशा गगनभेदी आरोळ्या ठोकीत तगडे जवान तांदूळ-साखरेचीं पोतीं खांद्यावर मारीत आणि पसार होत ! मी तसाच पुढं झालों, कादरच्या दुकानाशीं आलों. पुढच्याच नाक्यावर फायर ब्रिगेडचे लोक एक जळती झोंपडी विझवीत होते—आणि त्याच्या लगतच असलेली पोलीस चौकी लोक जाळण्याच्या खटाटोपांत होते ! फायर ब्रिगेडच्या देखत चौकी खालीं आणि-आणि तिला आग लागली ! एवढ्यांत—

— थॉड्—थॉड्—थॉड्

" आले ! आले ! पळा-धांवा ! " सोल्जर लोकांची लॉरी आली आणि कोणीतरी इशारा दिला. लोकांची पांगापांग झाली.

जाळ्याच्या आच्छादनाखालीं सोल्जर संगीनी रोखून बसले होते. त्यांची लॉरी दादरच्या रोखानं भुर्रकन् निघून गेली.

पोंवळ्यांतून गांधीलमाशा बाहेर पडाव्यांत तसे भराभर लोक पुन्हां रस्त्यावर आले. अश्रुधूर, लाठीमार, गोळीबार, कशालाही न जुमानणारे

ते लोक सारखा पुकार करीत होते—

“ गोरा माणस—निकल इधरसे ! ”

“ ब्रिटिश राज्—तोड दिया ! ”

“ करेंगे या—मरेंगे ! ”

आतां सगळ्या शाळा सुटल्या होत्या. जवळच्या इंग्लिश शाळेंतील मुलं गांधी–नेहरूंचा जयजयकार करीत रस्त्यावर आलीं. क्षणाक्षणाला वातावरण तापत होतं. त्या मुलांतूनच कोणीतरी पुढारी झालं. नाना तऱ्हेच्या सूचना देण्यांत तें १६–१७ वर्षांचं पोरगं दंग झालं होतं ! उन्हानं लाल झालेल्या त्याच्या कोंवळ्या चेहेऱ्यावर गुलामगिरीची चीड स्पष्ट दिसत होती. त्यांच्या आरोळ्या, त्यांचा आवेश, त्यांची बेछुट वृत्ती ! मला वाटलं—

भिंतीवर डोकं आपटीत आहों हें माहीत असूनही डोकं फोडून घ्यायला तयार होणारी संतती आमचा देश प्रसवीत आहे—आझादीला हें दृश्य पाहून गहिंवरून येईल आणि या कोंवळ्या पिढीला तरी ती आपल्या कुशींत खास घेईल.

देशाकरितां नक्की काय करायचं तें त्या कोंवळ्या मुलांना कळत नव्हतं. ते मरायला तयार दिसत होते. तें मरण बेकार ठरलं तरी त्यांना फिकीर नव्हती. मी समोर पाहिलं. काय होतं ?

रघु ! हा मिसरुड न फुटलेला हिंदुस्थान आहे. पाहा त्यांचा बेडर-पणा. पोटभर पाहून घे. डोळ्याचं पारणं फेडून घे. असलीं दृश्यं पुन्हां पाह्यला मिळणार नाहींत. स्वतंत्रतादेवी कदाचित् या बलिदानानं प्रसन्न होईल आणि हा बेडरपणा, हें बलिदान पुनश्च तुला पाह्यला मिळणार नाहीं. डोळे भरून पाहून घे—आणि तुझा छोटा छोटू मोठा होईल तेव्हां अभिमानानं त्याला सांग—

‘ हिंदुस्थानला स्वातंत्र्य मोफत मिळालं नाहीं. त्याच्या कोंवळ्या लेंकरांनींसुद्धां रक्तदान केलेलं प्रत्यक्ष या डोळ्यांनीं पाहिलं आहे ! ’

मी समोर पाहिलं. दहा बारा मुलं टेलीफोनचा खांब उखडण्या-करितां धडपडत होतीं. दोन तीन मुलीहि त्यांच्यांत होत्या !

एवढ्यात--

जीपमधून सोल्जर लोक केव्हां आले कळलं नाहीं. रोखलेल्या संगीनी घेऊन त्यांनीं भराभर रस्त्यावर उड्या टाकल्या. चवताळलेल्या डुकरासारखे ते चारी दिशांना धांवत सुटले. दंगलींतले 'अस्सल' एव्हांना पळाले होते. शिट्यांवर त्यांच्या खुणा बसविलेल्या होत्या. ज्यांना त्या माहित होत्या तें शिट्या येतांच पसार झाले.

मुलांना त्या माहीत नव्हत्या. ते आपल्या इवलाल्या छात्या रोखून उभे राहिले. कांहीं घाबरून पळून गेले खरे; पण त्या जागेवर ठांसून उभे राहाणारेहि त्यांच्यांत होते. सारा क्षणाचा खेळ झाला.

"फॉट...... !"

आणि दुसऱ्याच क्षणाला मघां पुढाकार घेतलेलं तें कोवळं पोरगं धाडकन् रस्त्यावर कोसळून पडलं.

आजूच्या इमारतींतून बाया बापड्या सारा प्रकार पाहात होत्या. कळवळून कुठून तरी शब्द आले.--

"—अयाई--मेलं ग पोर...... "

पण तिथं कोणाला फुरसत होतीं ? एका सोल्जरानं त्या मुलाची एक तंगडी धरली आणि फुटपाथवर फेंकून दिलं त्याला.

आतां पुढं काय ?

आणखी चार पांच मुलं–मुली तिथं अजून उभीं होतीं. सोल्जरनं टिचकी वाजवून त्यांना गुरकावलं—

"चलो अंदर."

पटापट तीं मुलं जीपमध्यें जाऊन बसलीं, पण ती मुलगी तेथून हलेना ! शेवटीं बकोटी धरून तिला जीपमध्यें ढकलण्यांत आलं ! जीप

निघून गेली. धांवत त्या मुलग्याकडे मी गेलों, वेदनांनीं तो विव्हळत होता. त्याला उचलून घेऊन मी कादरच्या वखारींत शिरलों.

" ए बाबा, माफ करो; इधर मत आव--" कादरच्या दुकानांत एवढा पाषाणहृदयीं नोकर कोण होता तें मला पाह्यचं होतं. मी वर पाहिलं.

तो खुद्द कादरच होता !

" कादर ! "

" अरे कोण ? रघु ? कुणी सांगितलं बाबा इकडे यायला ? आणि हें कोण ? "

" एक शब्दही वायफळपणें बोलूं नको. आंत घे आधीं आम्हांला. "

कादरनं दार उघडलं. मी आंत गेलों. तो मुलगा अजून अर्धवट ग्लानींत होता.

" रघु, हॉस्पिटलमध्यें न्यायला पाहिजे रे–"

" मग चलना, आपण जाऊं घेऊन. "

" वेड लागलं का तुला ? कुणी सांगितलं तुला या भानगडींत पडायला. हॉस्पिटलमध्यें जायचं आतां म्हणजे सोपी वाटली गोष्ट होय तुला ! "

"कादर, इतका हृदयशून्य केव्हांपासून झालास तूं ? इतक्या खालच्या पायरीवर जाऊन बोलशील असं वाटलं नव्हतं मला. कॉफी तयार कर तूं. मी पाहून येतों एकादी मोटार मिळाली तर—" त्या मुलाला मी अलगद खालीं ठेवलं आणि बाहेर पडलों.

कादरनं मला थांबविलं.

" रघु चुकलं माझं, माफ कर. तूं जाऊन कांहीं व्हायचं नाहीं. मीच जाऊन येतों, तूं कर इथं कॉफी तयार. "

जरा वेळानं कादर त्या मुलाच्या नातेवाईक मंडळींना घेऊन आला. ते लोक त्याला घेऊन जाऊं लागले.

"मंडळी, आपण नातेवाईक आहांत मुलाचे–तेव्हां काळजी घ्यालच त्याची. पण रक्तस्राव फार झालेला आहे; तेव्हां अगोदर डॉक्टरां-कडे न्या त्याला."

"बेंद्रे, आपण कांहीं काळजी करूं नका. मी बाप आहें या मुलाचा; आणि मीच डॉक्टर आहें. आपल्याला फार तसदी पडली. माफ करा." कॉफी घेऊन ती मंडळी निघून गेली.

"कादर, लोकक्षोभाचं केवढं विक्राळ स्वरूप हें! काय झालं लोकांना भडकायला एवढं—"

"हळु विचार लेका. हसेल कुणी ऐकलं तर! काल पुढाऱ्यांना अटक झाली ना—आतां हें पेंढार मोकाट सुटलं आहे—"

"आतां गोळी खाणाऱ्या त्या डॉक्टरांच्या छोकऱ्यालाही तूं पेंढारां-तच जमा करतोस का?"

"पळतां पळतां लागली असेल गोळी—"

"त्याच्या पोटाच्या बाजूला लागली आहे गोळी."

"तुझ्यावर फार परिणाम झालेला दिसत आहे, रघु–"

"संगीनीपुढं छाती रोखून गोळी खातांना या मुलाला मी पाहिलं, आणि तूं म्हणतो आहेस––पळतां पळतां लागली असेल गोळी. एक तर अल्लानं तुझं हृदय गेंड्याच्या कातड्याचं बनवलं असावं, नाहींतर––"

"ही चळवळ या वेळीं मला योग्य वाटत नसावी! आणि तेंच खरं आहे. रघु, यांतून हिंदुमुसलमान दंगा निष्पन्न नाहीं झाला म्हणजे मिळवली."

"तूं पोशाखसुद्धां टाकलास जुना?"

"पोशाख उगाच टाकला आहे. धंदा सांभाळायचा असेल तर गांधी-पोषाखांत कठीण आहे या दिवसांत. या क्षणाला शिपाई दुकानांत शिरतील. कापड सगळं खादीचं आहे. फक्त रूप मुसलमानी ठेवलंय. येईल ती वेळ मारून नेली पाहिजे, रघु–"

" मुसलमानांना नाहीं कां धक्का लावत हे लोक ? "

" संभव कमी– "

" कां ? राजनिष्ठ आहेत असं वाटतं त्यांना ? "

" त्यांना वाटतं तसं एवढं खरं. कायदे आझमचा काँग्रेस–विरोध म्हणजे राजनिष्ठा असं काँग्रेसचे लोक सुद्धां मानतात; तिथंच माझ्यासारख्या प्रामाणिक काँग्रेसनिष्ठांचा काँग्रेसशीं मतभेद होऊं लागला आहे. "

तो सबंध दिवस आम्हांला वखारींत काढावा लागला. दुसऱ्या दिवशीं आम्हीं त्याच्या घरीं गेलों. जेवायला, चहा प्यायला मला रस्त्यावर उतरावं लागे. दादर मेनरोडवर फारशी धमाल नव्हती; तरीसुद्धां कोण धास्ती वाटे खालीं उतरायचं म्हणजे.

रात्रीं कादर रेडियोवर निरनिराळीं स्टेशनं घेत होता.

" आझाद हिंद रेडियो स्टेशन, सायगांव ! "

तो पुकार झाला न् मी खडबडून ऐकूं लागलों.

सुभाषचंद्रांनीं पूर्वेत कांहीं तरी प्रचंड कार्य हातीं घेतलं होतं. त्यांच्यासंबंधीं अनेक अफवा मुंबईत उठत होत्या. ब्रह्मदेशांतून ते हिंदुस्थानावर सशस्त्र चालून येणार असंहि बोललं जात होतं. आतुरतेनं आम्ही रेडियो ऐकूं लागलों.

" आझाद हिंद–झिंदाबाद ! "

" वंदे मातरम् ! "

" महात्मा गांधी कीं जय "

अबदुल रशिद नांवाच्या कोणा गृहस्थाचा पुकार झाला. ते काय सांगणार आम्हीं ऐकूं लागलों. घड कांहींच कळेना, तेव्हां स्टेशन बंद केलं.

आठ दिवसांनीं मी साखरपेंडीला परत आलों. इतिहासांत नोंद होणाऱ्या किती तरी गोष्टी घडलेल्या माझ्या डोळ्यांनीं मी पाहिल्या आणि

माझी मुंबईची वारी सार्थकीं लागली असं मला वाटलं. ही आग आतां कितपत आणि कुठवर पसरणार याविषयीं अनेक तर्ककुतर्क चालू होते. डोक्यावर या विचाराचे प्रहार घेत घेत मी मुंबई सोडली.

* * *

## : १४ :

प्रत्येक माणसाच्या आयुष्यांत सुखदुःखाचे कांहीं प्रसंग असे होऊन जातात कीं मन जरा रिकामं झालं कीं ते पटापट वर डोकावूं लागतात. कादरची-माझी वडाखालची पहिली भेट, अण्णांच्या अंगावर मी उगारलेला सोटा, पहिल्या पगारांतील आत्याला दिलेला एक रुपाया, आमच्या छोटूचा जन्मसोहळा, असे अनेक प्रसंग एथवरच्या आयुष्यांत मी अनुभवले होते. सध्यां १९४७ साल चालूं आहे. या प्रसंगाच्या जोडीला आतां असे कितीतरी प्रसंग येऊन बसले आहेत. विचार करूं लागलं कीं मला वाटतं—आनंदाचा अतिरेक झाला. मागून दुःख येणं क्रमप्राप्त होतं. गेल्या वर्ष दीड वर्षांत नियतीचीं जीं जीं चेष्टितं मी पाहिलीं त्याला तोड नाहीं.

पंचेचाळीसच्या दिवाळीच्या सुट्टींत मी मुंबईला कादरकडे गेलों होतों. बोटीवर तो मला घ्यायला आला होता. भेंडीबाजारांतून आम्हीं दादरला आलों. वाटेंत हबीब बँकेजवळ कादर कामाला उतरला होता. बाहेर मी नजर टाकली. जिकडे तिकडे लीगच्या निशाणांची रोषणाई केलेली होती. उर्दु लिप्यांतील घोषवाक्यांच्या पताका जिकडे तिकडे फडफडत होत्या. बेचाळीस सालीं कादरकडे आलों होतों, त्यानंतर तीन वर्षांनीं आतां आलों. केवढा फरक झाला होता या तीन वर्षांत !

बेचाळीसमध्यें ज्याला ‘ऑगस्ट क्रांति’ म्हणून आतां संबोधिलं जातं त्या लढयाचा त्वेष मला पाहायला मिळाला. हिंदु--मुसलमानांचा

दंगा त्यांतून उद्‌भवेल हें कादरचं भविष्य खोटं ठरलं. पण आज ती महंमदअली रोड, भेंडी बझार एथील रोषणाई पाहिली न् मला खरोखरच वाटूं लागलं—

मुंबईला वाटेल त्या क्षणीं दंगा भडकणं शक्य आहे!

कसलींशी उर्दु पावती–पुस्तकं घेऊन कादर पंधरा मिनिटांत परतला. आमची मोटर पुढं चालूं झाली.

"कादर, हा सारा भाग फुललेला दिसतो आहे अगदीं! कसल्या या पताका आहेत?"

"रघु, हें पाकिस्तान–पर्व सुरूं झालं आहे हिंदी राजकारणांतील–"

"तुला वाटतं कादर, मुसलमानांना पाकिस्तान मिळेल असं?"

"रघु, आपल्या देशाला आझादी इतक्या लवकर मिळेल असं तरी कुणाला वाटलं होतं कां? पण आतां तें लवकरच मिळणार याविषयीं कुणालाच शंका नाहीं. महायुद्ध हा एक प्रचंड भूकंप ठरणार आहे. सपाट मैदानावर प्रचंड पर्वत उभा राहावा, हवेल्यांच्या जागीं समुद्र निर्माण व्हावा, असल्या गोष्टी आतां चमत्कार राहाणार नाहींत आहेत. या भूकंपांत पाकिस्तानच काय पण वाटेल तें निर्माण होऊं शकेल. पण माझी खात्री आहे, रघु लीग–कॉंग्रेस मध्यें कांहींतरी तडजोड झाल्याशिवाय राहणार नाहीं. दोघांना जिवंत राह्यचं असेल तर ती व्हायला पाहिजे. भूक, टंचाई, काळाबाजार याखालीं चिरडले जाणारे लोक नेत्यांच्या शाब्दिक मारामारीवर खूष राहतील असं मला तरी वाटत नाहीं."

आमची मोटार इब्राहीम मॅन्शनजवळ आली नी आम्हीं खालीं उतरलों.

कादरची माझी ही भेट माझ्या आयुष्यांत कायमचं स्थान मिळवून बसली आहे. फटाके, कापड, औषधं–मला बरीच खरेदी करायची होती. सारी यादी कादरनं आपल्याजवळ घेतली न् दुसऱ्या दिवशीं एक

भली मोठी ट्रंक त्यानं सामानानं भरून आणली. तें सामान पाहून मी गार झालों. एवढे पैसे माझ्याजवळ नव्हते.

" कादर, अरे पैसे नाहींत माझ्याजवळ फार. भारीशी काय खरेदी केली आहेस ? "

" हें बघ, ही जी सायकल आहे ती कादरकाकाची छोटूला खास भेट आहे. हे जे फटाके आहेत ते इकबलनं छोटूला दिले आहेत. ही रेशमी साडी हसिनेनं वहिनीकरितां दिली आहे न् हें वुलनचं कापड आहे त्याचा कोट शिवून मुस्ताफसाहेबांनीं त्यांची खास भेट म्हणून तुला द्यायचं ठरविलं आहे. बाकीचं चिल्लर सामान—गजराचं घड्याळ, कापड, छोटूचा खाऊ, बाहेरची ट्रंक हें सामान तूं विकत घेतलं आहेस. त्याचे पैसे आतां मला नको आहेत. मला दीडशेची प्रॉमिसरी नोट लिहून दे म्हणजे झालं. हल्लीं आमचा धंदा फारसा चालत नाहीं. तेव्हां भरंवशाच्या ठिकाणीं व्याजीं पैसे लावायचा धंदा मी सुरूं केला आहे ! समजला तुला हिशेब ? पुन्हां विचारूं नको. चांगली किंमत करतो आहेस माझी ! तुझ्या मनांत तरी कसं आलं मी पैसे घेईन असं ? "

" तूं कितीहि रागावलास तरी तुझं हें करणं मला नामंजूर आहे. घरीं म्हणतील काय मला ! "

" काय म्हणणार ? मुसलमानाकडलं आहे असंच ना ? गोमूत्र शिंपून घरांत ने म्हणजे झालं ! "

काय बोलणार कादरपुढं ! आमची ही शेवटची आनंदाची भेट ठरली. यानंतर आम्हीं भेटलों तरी प्रत्येक वेळीं परिस्थिती इतकी काळजीची, धोक्याची किंवा दुःखाची होती कीं आम्हीं चुरून गेलों त्या खालीं.

* * *

: १५ :

मुंबईहून मीं परत आलों आणि एकेक ताट वाढूनच ठेवलं होतं. सेहेचाळीसच्या जानेवारींत मियां घडवंचीवरून पडल्याचं निमित्त झालं. प्रथम ते यासंबंधी माझ्याजवळ कांहीं बोललेही नाहींत. आठ दिवसांनीं ढोंपर सुजून चांगलंच धरलं. तेव्हां त्यांनी मला बोलावणं पाठविलं. मियांना आतां हलतांही येईना. गांवठी उपाय करण्यापलीकडे तो विकार गेला होता. मिशन हॉस्पिटलमध्यें डॉ. मार्टीनना दाखवायला त्यांना नेलं. त्यांनी आठवडाभर निरीक्षणार्थ मियांना ठेवून घेतलं न् शेवटीं गुडघ्यापासून खालीं पाय कापायला पाहिजे म्हणून निर्णय दिला ! वेदना पाहृलासुद्धां महाग होत्या. मियांनीं शस्त्रक्रियेला तात्काळ संमति दिली. इलाजच नव्हता दुसरा. मियांचा पाय कापून काढण्यांत आला.

एथपासून पुढं कांहीं दिवस मियां जगले. पण आतां जगण्याची त्यांची आसक्ती साफ उडून गेली. रोज सकाळी ड्रेसिंगला त्यांच्याकडे मी जायचों. प्रातर्विधीसुद्धां त्यांना तेथल्या तेथेंच करावा लागे. रोज डोळयां·तून ते टिपं काढीत.

“ रघ्बा, मुलग्यासारखी सेवा करून घेतों आहे रे तुझ्याकडून. ”

माणूस कितीहि प्रेमांतील असो, कितीहि जवळचं असो---त्याच्या-कडून सेवा करून घेणं दु:खकारक असतं. हा प्रसंग ज्याच्या वांट्यास आला तोच त्यांतील दुःख जाणे.

" काय करायचं मियां ? मला आनंद वाटतो का सेवा करण्यांत ? एकदां या जखमा बऱ्या झाल्या कीं मोकळे व्हाल तुम्हीं. मुंबईला जाऊन लांकडी पाय बसवूं आपण; मग तुम्हांला चांगलं चालतांही येईल. "

"नको रे बाबा ! जगायची इच्छा नाहीं आतां रघ्बा. आता काय पाह्यचं आहे मला ? इकबल, छोटू यांना पाह्यला मिळालं. अल्लानं खैर केली. आतां मी सुखांत मरेन. "

आणि मग मला विषय बदलावा लागे. तेव्हांच मियां थांबत.

मुंबईहून कादर त्यांना भेटायला आला. तेव्हांचं दृश्य रडूं आणणारं होतं. घडधाकट स्थितींत मियांना त्यानं पाहिलं होतं. आतां एका पायाचा हाडाचा सांपळा पाह्यची त्याच्यावर पाळी आली.

" अब्बाजान......! " कादरनं हंबरडा फोडला आणि ते बाप-लेक कडकडून भेटले.

मियांचा निरोप घेऊन कादर मुंबईला जायला निघाला न् त्याच्या डोळयांतील पाणी कांहीं थांबेना. पुढचं सारं भविष्य त्याला दिसत होतं.

" रघु, तूं आहेस म्हणूनच मी मुंबईला जात आहे. अब्बाजान फार दिवस काढतील असं दिसत नाहीं. इकबल नी हसिना दोघांना इथंच ठेवीन म्हणतों. मुंबईला दंग्याच्या अफवा उठताहेत. तेव्हां भरीला आणखी त्यांची काळजी नको. जशी अल्लाची इच्छा असेल तसं होईल. "

" कादर, इकडील कांहीं काळजी करूं नको. तूं मात्र काळजी घेत जा. हिंदु लत्त्यात आहेस. मुसलमानी पोषाख बदलून पूर्वीचा गांधी ड्रेस चढवलास तर बरं होईल. एकदां आग पेटली कीं ओलं-सुकं सारं जळतं. "

कादर कांहीं बोलला नाहीं. तो बोलायच्या परिस्थितींत नव्हता.

पुढच्याच महिन्यांत माझ्या आईचं देहावसान झालं. उतार वयांत सौभाग्य घेऊन हिंदु स्त्रीनं इहलोक सोडणं यापरतं तिच्या दृष्टीनं थोर भाग्य नसतं. त्या दृष्टीनं आई भाग्यवान् ठरली. माझ्या आईसारखी

समाधानी स्त्री माझ्या पाहाण्यांत नाहीं. आम्हां बापलेकांचा झगडा वग-ळला तर तिनं कोणतीहि गोष्ट मनाला लावून घेतली नाहीं. हर्ष नाहीं, दु:ख नाहीं. असला विलक्षण मानसिक कोष होता तिचा. मी एवढा कर्ता सवरता झालों, ट्रेंड होऊन आलों--पण आईनं त्याचं अवास्तव स्तोम कधींच माजवलं नाहीं, जाहिरात तर नाहींच नाहीं. अण्णांच्या मानानं ती थोराड होती. आम्हीं सारीं भावंडं अंगापिंडानं तिच्या वळणावर गेलों होतों. सारीं सौभाग्यलेणीं लेवून आईची भारदस्त मूर्ति कुठं बाहेर पडली म्हणजे सारे लोक तिच्याकडे आदरानं पाहूं लागत. आईची पुण्याई अण्णांच्याइतकीच जबरदस्त होती. आईनं इहलोकाची यात्रा संपविली तेव्हां 'साखरपेंडीची एक सती सौभाग्य घेऊन गेली!' असं म्हणून सारी साखरपेंडी हळहळली.

आईच्या मृत्यूनं मला अर्थातच वाईट वाटलं. मृत्यूनंतरच ज्यांचं योग्य मूल्यमापन केलं जातं अशा दुर्दैवी माणसापैकीं आई एक होती. माझ्यापुरतं मी हें म्हणत आहें. आईचा मोठेपणा आई गेल्यानंतरच मला कळला. पण मला कशाचं आश्चर्य वाटलं असेल तर अण्णांचं. माझ्यापेक्षां कितीतरी पटीनं अधिक अण्णांना वाईट वाटलं! एवढा धक्का बसण्याइतकं अण्णांचं आईवर प्रेम असेल असं मला वाटलं नव्हतं. पण अण्णांनीं आपल्या धर्मपत्नीवर हल्लींच्या तरुण माणसाइतकं प्रेम केलं. फक्त 'प्रिये, लाडके' असलं प्रदर्शन त्यांत नव्हतं. आईच्या मृत्यूनं अण्णांनीं हाय खाल्ली आणि दोन आठवड्यांपेक्षां अधिक ते जगलेही नाहींत.

आतां ते मरायची वेळ झाली होती; तरीपण माझ्या दृष्टीनं तो आघात होता. तसं पाहिलं तर अण्णा नी मी आयुष्यांतील बहुतेक भाग एकमेकांवर गुरगुरण्यांत घालविला होता. आईला सुखाचे चार घांस कधीं खाऊं दिले नाहींत. पण मला मुलगा झाल्यापासून हें सारं यक्षिणीच्या कांडी प्रमाणं फिरलं. लग्न झाल्यावर बारा वर्षांनीं आमचा छोटु झाला. कुल-

वृद्धीची आशा अण्णांनीं आतां सोडली होती. अशा स्थितींत छोटूचं आगमन झालं न् आमच्या घराची फुलबाग होऊन गेली.

अण्णा, आई, आत्या यांनीं छोटूचे जे लाड केले, कौतुक केलं तें करून घ्यायला भाग्य लागतं. अण्णांचा खुद्द माझ्यावर विश्वास नसे. कितीहि हळुवारपणें त्याला उचललं तरी त्यांना तें आवडायचं नाहीं. त्यांच्या वात्सल्यदृष्टीला त्यांत धसका दिसे.

" किती धसक्यानं घेतोस त्याला—तूं घेत जाऊं नको पाहूं. " मला म्हणायचे ते. माझ्या डोळ्यांत प्रेमाश्रु उभे राहत.

कादरनं दिलेल्या बाबागाडींतून त्याला ते आगरांत फिरवीत. त्यांचं सोवळं एवढं कडक—पण ते पूजा करीत असतांना छोटु जवळच विधी करूं लागला तरी तो गंमतीचा विषय होई !

' भलतेच लाड नकोत हो अण्णा ' म्हणून आत्या त्याला नेऊं लागली कीं अण्णा लहान मुलासारखे हसूं लागत—

" हेंच चुकतं तुमचं. त्याच्यांत आणि परमेश्वरांत फरक कसला करतां ? ओय का नाहीं ले छोट्या——हां–हां–हां. बघ म्हणावं त्या आजीला आमचा क्रीश्न कसा हंसतोय तो—— "

संध्याकाळीं जरा कुठं बाहेर न्यायची सोय नाहीं. लगेच अण्णा विचारूं लागत——

" कुठं नेलं होतंस ? "

" कशाला नेलं होतंस ? "

" हजार वेळां तुला सांगितलं आहे——त्याला टोपरं घातल्याशिवाय नेत जाऊं नको कुठं. "

किती तक्रारी ते सुरूं करायचे. आईनं छोटूच्या अंगावरून दही-भात ओंवाळून टाकीपर्यंत शांत व्हायचे नाहींत. एक दिवस बाबागाडीं-तून त्याला मी बंदरावर फिरायला नेलं होतं. संध्याकाळी घरीं आल्यावर छोटूला शिंका येऊन ताप भरला—आणि अण्णा मला सपाटून रागें

भरलें ! छोटू झाल्यापासून कितीतरी दिवस त्याला मियांकडे न्यायचं माझ्या मनांत होतं, पण तो वर्षाचा होईपर्यंत देवीच्या देवळापुढं अण्णांनीं त्याला नेऊं दिलं नाहीं !

आतां अण्णांचा राग गेला. आई प्रथमच हंसूं लागली. आत्याच्या डोळयांचं पारण फिटलं. अशा या फुलबागेंतून आमचा वटवृक्ष एक दिवस अकस्मात् उमळून पडला. ज्याच्या छायेखालीं आम्हीं विसांवा घ्यायचा तो वृक्षच कोंसळला ! बाग उजाड झाली ! अण्णांचा मृत्यु म्हणजे दीर्घ शोकनाट्याची केवळ नांदी होती. यानंतर आपत्तीवर आपत्ती येऊं लागल्या आणि शेवटीं एक वेळ अशी आली कीं त्यापुढं शोक, दुःख, भीति या माझ्या भावनाच मरूं लागल्या. कशाचं वाईट वाटून घ्यायचं असं होऊन गेलं !

महागाई, टंचाई मी म्हणत होती. एक वेळ कणी आणि एक वेळ पाणी अशा परिस्थितींत साखरपेंडीचीं कितीतरी माणसं आज आयुष्य कंठीत होतीं. ही कथा साखरपेंडीची, मग आजूबाजूला काय परिस्थिती असेल ? कुठं फिर्याद गुदरणार ? मामलेदाराकडे गेलं तर तोच इतकं केविलवाणं तोंड करायचा कीं वाट, वाटेल तिकडे चलावं पण या रावसाहेबांकडे नको !

टंचाईची उणीव मला फारशी भासत नव्हती. लाडू जिलब्यांवरच जे जगत आले त्यांना टंचाईचा त्रास न् भीति. आमचा पिंड लवंगी मिरची न् मस्तपैकीं ताकभात यांवर पोसला होता ! गहूं मिळाले काय न् न मिळाले काय. महागाईनें थोडाफार बेजार झालों होतों; पण तो सुद्धां नित्याच्या गरजांना नाहीं. कांहीं दुखणं पाखणं आलं, मनासारखे वैद्यकीय उपचार करतां आले नाहींत म्हणजे मात्र चीड येई गरिबीची. गेलीं कित्येक वर्षें कादर दुकानांत भागीदार म्हणून बोलवीत होता तिकडे जायचा मोह अशा वेळीं होई. पण तेवढंच तें. कादरला म्हटलं तेंच खरं. आमचा पिंड साखरपेंडीच्या अन्नाचा आहे. मसणबिदींतूनच आम्हीं बंदरावर जायचे. आम्हीं तळमळूं तसे गेलों नाहीं तर !

महागाई, टंचाई जणूं पुरेशी नव्हती. धरित्रीमाई कोपली होती. सावित्रीमाई कोपली होती. मुंजाबाच्या डोहांत उडी घेणारा सावित्रीचा प्रवाह या वर्षी मे महिन्यांत अजिबात आटला! महापुरुषाचं स्नान चुकलं! साऱ्या गांवांत हाहाःकार उडाला! म्हातारे लोक बोलूं लागले—

" हें चिन्ह चांगलं नव्हे--साखरपेंडीवर अरिष्ट कोसळणार! "

आणि तसंच झालं पुढं. श्रावणांत सावित्रीनं कहर केला. नारळी पौर्णिमेच्या दिवशीं तिला नारळ अर्पण करणं अशक्य झालं. एवढा प्रचंड पूर आला तिला. झपाटल्यासारखी ती इतस्ततः धांवत होती. सराईत कोळी तिचं विक्राळ रूप पाहून स्तंभित झाले. मुसलमानवाडा, कोळीवाडा जलमय होऊन गेले. गेले दोन दिवस मियां, अम्माजान, भाभी (कादरची बायको), इकबल सारी मंडळी घराच्या वरच्या मजल्यावर कसेबसे दिवस काढीत होती. त्यांतच भाभीचा प्रसूतीसमय होता! वैऱ्यावरसुद्धां असलीं संकटं येऊं नयेत. गेले दोन्ही दिवस त्यांना मी घराहून जेवण नेत होतों. आज सकाळीं सावित्रीचं पाणी बरंच ओसरलं होतं. दुपारचं जेवण घेऊन मी मियांकडे चाललों होतों. कोळीवाड्याच्या तिठ्याशी आलों. छोटा इकबल माझ्या दिशेनं धांवत येत होता. त्याला मी पाह्यलं न् छातींत धस्स झालं माझ्या. मियांचा जराजर्जर देह माझ्यासमोर उभा राहिला. गेल्या रात्रीच्या पुरांत मियां वाहून तर गेले नाहींत?

" दादा, नानाजाननीं ( मियां ) आदी बोलावलंय तुमांला. "

" चल, मी तिकडेच येत होतों. काय झालं रे इकबल? "

" मला म्हाइत नाय्. नानाजान रडताहेत न् दादीपण. "

" मियां शाबूत आहेत तर! " मी सुस्कारा टाकला न् वाट चालूं लागलों. पण मियां रडत कां आहेत? मला एकदम आठवण झाली—

दंगा!

गेले आठ दिवस मुंबईत दंगा उसळला आहे!

कादर दादरला हिंदु वस्त्यांत आहे!

कादरचं कांहीं बरं वाईट तर झालं नाहींना ?

माझं बर्फ व्हायची वेळ आली. खरोखर असं कांहीं असेल तर—

तर ही आपत्तीं नव्हे--

मियांचा सर्वनाश आहे हा !

परमेश्वरानं मियांना फारसं दुःख दाखवलं नव्हतं. आतां त्याचा सूड निघणार काय ? मियांचं घर गांठीपर्यंत माझ्या तोंडांत रामनाम चालूं होतं. घरांत अजून चवडाभर पाणी होतं. माजघरांतल्या जिन्यानं मी वरच्या माळ्यावर गेलों. मियांचे डोळे शून्याकडे दृष्टी लावून बसले होते.

" या खुदा तेरा लाख लाख शुक्र है ! " तोंडानं ते पुटपुटत होते. मला त्यांनीं पाहिलं मात्र-त्यांच्या डोळ्याला सारखी धार लागली, ती कांहीं केल्या थांबेना. उशागतीं ठेवलेलं पत्र त्यांनीं माझ्याकडे दिलं.

७८६

इब्राहिम मैनशन,
दादर मेन रोड.
रविवार, ९ सप्टेंबर १९४६

मियांसाहेबांस बहोत बहोत सलाम--

इलाहि कृपेनं आम्हीं सर्व सुखरुप आहोंत. शहरांत दंगा सध्यां लई आहे त्यांत आपल्या पण वाट्याला थोडासा आला आहे. अल्लाकडे सेवा रुजु होईल ही खात्री बाळगा. हें जिहाद आहे आणि आपल्याला थोडी घस सोसावी लागली तर आनंदानं सोसली पाहिजे. गेल्या बुधवारीं कादरच्या दादरच्या दुकानावर काफिरांनीं हल्ला केला. दुकान लुटली. घाणीची नासधूस झाली. कादरला मानेवर नी मनगटावर वार झाले आहेत. तो घरीं आनंदांत आहे. काफीर लोकांचा कटच दिसत आहे. त्यांच्या एका डॉक्टरला आम्हीं जखमा बांधायला बोलावलं. त्यानं साफ नकार दिला. बोलतो काय, तुमच्या लत्त्यांत आलों तर जिवाची खात्री

काय ती सांगा. त्यांना म्हणावं तुमच्यापेक्षां अल्ला कादरची काळजी घ्यायला समर्थ आहे. जखमा किरकोळ आहेत. दोन चार दिवसांत बऱ्या होतील. काळजी करूं नये. बरं वाटल्याबरोबर तो साखरपेंडीला येत आहे. आम्हीं लवकरच याचा बदला घेतल्याशिवाय राहणार नाहीं........

आपला

..................

' आपला ' कोण होतं त्याकडे माझं लक्ष नव्हतं. त्या पत्रांतील सारीच भाषा विष पसरावं तशी माझ्या शरीरांत पसरत होती.

कादरचं दुकान उध्वस्त झालं.

खुद्द तो जखमी झाला.

मियांनीं हाय खाल्लेली.

हे आघात मला खालीं बसवायला समर्थ होते. असल्या या परिस्थितींत सुद्धां हिंदु डॉक्टराचा तो उल्लेख, ' बदल्या ' ची ती भाषा—मला चीड आल्याशिवाय राहिली नाहीं त्याची.

बदला ! होय, अक्षरश: खरं आहे. बदला घेतला पाहिजे ! पण कुणी नी कुणाचा ? कादर या व्यक्तीचा प्रश्न इथं नाहीं. तशीच वेळ पडली तर त्याच्याकरितां मी रक्त सांडायलासुद्धां मागें येणार नाहीं. पण—

कांहीं गोष्टी अशा असतात—एखाद्या बारीकशा प्रसंगानं त्यांना चालना मिळावी लागते. माणूस विचार करूं लागतो, न् त्यांतून अकल्पित कांहींतरी बाहेर पडतं. ' आपला ' जो कोणी होता त्याची ती बदल्याची भाषा ऐकली न् मी विचार करूं लागलों.

कलकत्याचे भयानक प्रकार साखरपेंडीसारख्या कोंपऱ्यांतसुद्धां आम्हांला शरमिंधे करीत होते. मुंबईतील दंग्याच्या बातम्या तितक्याच क्षोभकारक होत्या. मुंबईच्या दंग्यांत पहिल्या तीन दिवसांत काय झालं, आम्हांला काय कळत नव्हतं. पण नाहीं ! हिंदु तापत नाहीं. तापला तरी त्याचा ताप फार काळ टिकत नाहीं हेंच खरं. परिस्थिती धक्के मारून त्याला

कामाला लावते. परिस्थिती निघून गली म्हणजे कामहि निघून जातं ! आठवड्यांतून दोन वेळां ‘ केसरींतल्या बातम्या ’ वाचतांना आम्हीं काय तापत नाहीं ? फार तापतों आणि बडबडतों. पण वाचन संपल्यावर दोन तासांनीं ‘ रघुदादा बेंद्रे ’ शाळेची वाट संथपणें चालत असतात. गेले दोन महिने खुद्द साखरपेंडीला काय कमी प्रकार चालले आहेत ? प्रत्येक मोटरीवर लीगचा हिरवा झेंडा लावलेला आहे. कारण ? सारी मोटार वाहतूक त्यांच्या ताब्यांत आहे ! नानाप्रकारचे दिन साखरपेंडीचे मुसलमान साजरे करीत असतात. हिरवे झेंडे फडकतात, ‘ अल्लाहो अकबर ’ च्या आरोळ्या उठतात. भर हिंदु वस्तींतून शेरल्ली बिनदिक्कत मिरवणुका काढतो. जें जें भेंडीबझारांत होतं तें तें दुसऱ्या दिवशीं साखरपेंडीला होत असतं, फक्त दंगा व्हायचा राहिला आहे ! आम्हीं हें सारं पाहात आहोंत, पण कधीं चिडत नाहीं.

पण ही बदल्याची भाषा वाचली न् प्रथमच माझ्या अंगाची लाही झाली. कांहीं वेडं वाकडं बोलण्याची ती वेळ नव्हती, तें स्थळ नव्हतं. मियांचा जर्जर देह खाटेवर तळमळत होता. माझं पहिलं कर्तव्य मियांची काळजी घेण्याचं होतं.

मियांकडे मला फार दिवस पहावं लागलं नाहीं. ते सत्तरीच्या घरांत आतां आले होते. गुडघ्याच्या शस्त्रक्रियेपासून त्यांचा विलक्षण शक्तिपात झाला होता. मियांनीं पत्र वाचलं न् तिसऱ्या दिवशीं ते पैगंबरवासी झाले. साखरपेंडी एका दिलदार नागरिकाला मुकली.

* * *

## : १६ :

मियां गेले नी आठ दिवसांनीं कादर साखरपेंडीला आला. त्याच्या मानेवर अजून बँडेज होतं. त्याला आणायला मी गाडी घेऊन गेलों होतों. आलेला कादर जुना कादर नव्हता. गेल्या कांहीं दिवसांत त्यानं अनेक आघात लागोपाठ सहन केले होते. पूर्वींची त्याची लाल कांति कमी होऊन तो पांढुरका दिसूं लागला होता. शरीर पुष्कळच झडलं होतं नी भादरलेल्या केसांमुळं तो अधिकच कृश दिसत होता. बोटींतून तो पडावांत उतरत होता. त्याला मी पाहिलं न् धक्का बसला मला. हात धरून त्याला मी पडावांत घेतलं. पडावांत उतरून धक्क्यावर आलों. बंदरावर चहा घेतला. गाडी जुंपली. बोजे गाडींत भरले. गाडी पुळणीवरून वर आली. आम्हीं भुइकोट मागं टाकला.

या अवधींत कादर माझ्याजवळ फारसं बोलला नाहीं. शरीराला झालेल्या जखमांपेक्षां मनाच्या जखमांनीं तो अधिक घायाळ झाला होता. शेवटीं मीच बोलायला सुरवात केली--

“ कादर, असा निराश कां झाला आहेस ? आकाश कोसळलं आहे तुझ्यावर हें खरं; पण आपण तें वीस बोटांनीं वर उचलूं. फक्त तूं धीर सोडूं नको. ”

“ रघु, तुझा कादर आतां बदलला आहे. ”

“ अर्थ नाहीं कळला मला तूं काय म्हणतोस त्याचा—”

" मनुष्य भाजला म्हणजे त्याच्या अंगावर फोड येतात–याचा अर्थ तुला कळत असेल तर मी काय म्हणतों याचा अर्थ तुला कळला पाहिजे."

" फोड बरे होतील–काय त्याचं एवढं ?"

" बरे होणारे हे फोड आहेत असं मला नाहीं वाटत."

" विनाकारण लावून घेतलं आहेस तूं––"

" विनाकारण नाहीं ! मनाला फसविण्यांत काय अर्थ आहे ? मी केवळ मुसलमान म्हणून हा हल्ला माझ्यावर झाला. असंच जर व्हायचं असेल तर मुसलमान पाकिस्तान मागतात म्हणून हिंदूंनीं चिडावं तरी काय म्हणून ?"

" कोणत्या परिस्थितींत तुझ्यावर हल्ला झाला तें लक्षांत घेऊनच या प्रश्नाचा विचार करावा लागेल–– "

" म्हणजे माझ्यावर झालेला हल्ला बरोबर होता म्हण ना स्पष्टपणें."

मी ते शब्द ऐकले न् अभावितपणें माझ्या हातून कांसरे खेंचले गेले. बैल जेथच्या तेथें उभे राहिले. कादर बोलायचा एकदम थांबला. माझी व्यथा कादरच्या लक्षांत आली असावी. तो झटकन पुढं झाला.

" रघु, राग आला तुला ?"

" चिडण्याची ही कला तूं कुठं पैदा केलीस कादर ? मी सरळ विचारतोंय तुला न् तुझं तिसरंच...दुकानावर हल्ला झाला तरी केव्हां ?"

" तीन तारीख केव्हां होती ? सोमवारीं. त्या दिवशीं सकाळीं मी दुकान उघडायला म्हणून गेलों. शिवाजी पार्कच्या कोपऱ्याशीं आलों न् पाहिलं. दुकानाशीं लोक जमले होते. जरा पुढं गेलों. दुकान फोडायला सुरुवात झाली होती. दुकान फोडण्यांत जे भाग घेत होते त्यांनीं एकेकाळीं माझ्याबरोबर कॉंग्रेसमध्यें काम केलं होतं म्हणून मला फार वाईट वाटलं. दुकान फुटायला कितीसा वेळ लागणार ? भराभर तेलाचीं पिपं

रस्त्यावर फेकलीं गेलीं. गेल्याच वर्षी बसविलेली विजेची घाणी–फोडून तोडून तिचे तुकडे करण्यांत आले. या साऱ्या गोष्टी होत होत्या तेव्हां पोलीस सारा प्रकार पाहात उभे होते. तूंच सांग–कॉंग्रेसवर कसा विश्वास बसावा ? हें काम होत आहे तों हल्लेखोरांचं लक्ष माझ्याकडे गेलं. धांवत सुटले ते माझ्या दिशेनं. गांधी पोषाखानंसुद्धां माझं रक्षण झालं नाहीं. सुदैवानं माहिमकडून येणारी बस तेवढ्यांत आली म्हणून; नाहीं तर त्यांतून जिवंत सुटणं अशक्य होतं. " जणू सारा प्रकार पुन्हां घडत आहे अशा आविर्भावानं कादर बोलत होता.

" कादर, तुला राग येणार नसेल तर स्पष्ट बोलणार आहे मी ! "

" बोल ना–स्पष्ट बोल—"

" एकेकाळीं तुझ्याबरोबर कॉंग्रेस कार्य केलेलीं माणसं दुकान फोडीत होतीं असं तूं म्हणतोस. न् हें सारं शिवाजीपार्कच्या कोंपऱ्यावरून तूं ओळखूं शकलास ! "

" म्हणजे मी खोटं बोलत आहे असं वाटतं का तुला ? "

" असा चिडूं नको. आज मी स्पष्ट बोलणार आहें— "

" बोल, स्पष्ट बोल. "

" जे एकदां कॉंग्रेसमध्यें होते ते जन्मभर त्या संस्थेंतच असले पाहिजेत असं तूं कां गृहीत धरून चालतोस ? तूं सुद्धां आज कॉंग्रेसमध्यें कुठं आहेस ? तूं जर लीगमध्यें जाऊं शकतोस तर त्यांना काय एवढं अशक्य आहे कॉंग्रेसला सोडायला ? "

" म्हणजे काय माणसानं असं नंग व्हायचं— ? "

" मुळींच नाहीं. मला फक्त एवढंच सांगायचं आहे कीं, कॉंग्रेसला तूं उगाच आणतो आहेस मध्यें. पोलीस नुसतं पहात राहिले म्हणतोस तू. तेथें जमाव किती होता, पोलीस किती होते, हत्यारबंद होते कीं नाहीं मला कांहींच माहीत नाहीं— "

" दहा मिनिटांच्या अंतरावर माहीम पोलीस स्टेशन आहे रघु. मनांत असतं तर वाटेल तें करूं शकते पोलीस. "

" मी म्हणतों मुद्दाम होऊन ते गप्प राहिले--"

" असं बोल-- "

" पण म्हणजे कॉंग्रेस सरकारचे हुकूम त्यांना असे होते असं तुला म्हणायचं आहे का ? "

" नसतील कदाचित्– पण त्यांची त्यांना फूस असली पाहिजे. "

" आणि तें कशावरून ? अरे हे प्रकार सर्वत्र होत आहेत. कलकत्त्याला काय झालं ? माणूस माणुसकी विकून वागूं लागल्यावर कुठलं सरकार त्याला पायबंद घालूं शकेल ? "

" म्हणजे सरकारची यांत जबाबदारी कांहीं एक नाहीं. "

" हें पहा कादर, मी कांहीं कॉंग्रेसभक्त नाहीं. कॉंग्रेसची तरफदारी करण्याची मला इच्छा नाहीं. पण मला जें योग्य वाटतं तें कॉंग्रेसचं समर्थन करणारं आहे म्हणून बोलायचं नाहीं असं समजण्याइतका मी दुधखुळाहि नाहीं. तें सारं जाऊं दे. तूं काय म्हणालास तें सारं मी ऐकलं. आतां मला असं सांग—काय केलंस म्हणजे तुझं नुकसान भरून येईल असं वाटतं तुला ? "

" जाऊं दे तो विषय. तुला मला काय करायचं त्याच्याशीं ? "

" कादर कांहींतरी लपवून ठेवायचंय तुला माझ्यापासून— "

" खरं सांगू रघु ? एका माणसाच्या नुकसानीचा हा प्रश्न आतां राहिला नाहीं. अशीहि वेळ येईल कीं माझी जिन्दगीच काय पण मीहि मरून जाईन. पण या परिस्थितींतून सुटायचं असेल तर— "

" तर काय व्हायला पाहिजे ? "

" पाकिस्तान ! एका पाकिस्तानानंच हा प्रश्न सुटेल अशी माझी खात्री झाली आहे. "

पाकिस्तान ! ‘ पाक ’ लोकांचा देश ! माझ्या अंगावर शहारे उभे राहिले.

सावित्रीनं ज्याला प्रेम करायला शिकवलं, साखरपेंडीच्या अन्नोदकावर ज्याचा पिण्ड पोसला, ज्याच्या बापजाद्यांनीं दुर्गोत्सवाला मानाचं तेल देण्यांत अभिमान बाळगला, पोंक्षे मास्तरांनीं पोटच्या पोरासारखं ज्याचं कौतुक केलं, हिंदुसुद्धां इतका सत्प्रवृत्त असूं शकणार नाहीं म्हणून ज्याची आजवर मी एवढी स्तुति केली तोच कादर आज पाकिस्तानची भाषा बोलत होता. कादरचं रक्षण करायला यापैकीं एकहि संस्कार समर्थ ठरला नाहीं ! कादरची ही कथा, मग इतरांचं काय असेल ? तो ‘ बदला ’, ही पाकिस्तानी भाषा ! वीस वर्षांपूर्वीं अण्णांनीं काढलेले उद्गार मला चिरीत आरपार झाले--

“ हे लोक शेवटीं आपल्या जातीवर जातील-लक्षांत ठेव माझे शब्द ! ”

छे, छे, देव करो नी असं कांहीं न होवो. माझ्या उफाळून येणाऱ्या साऱ्या भावना मी प्रयासानं दाबून टाकल्या. एक शब्द बोलायचीच खोटी होती--हृदयांतील माझ्या आगीनं कोणतं रूप धारण केलं असतं हें सांगणं कठीण होतं.

* * *

## : १७ :

आज तारीख वीस ऑक्टोबर, एकोणीसशें सेहेचाळीस ! नौखालीचं भयानक हत्याकांड वाचून मी केसरी नुकताच खालीं ठेवला होता. नौखाली अनेकांचा लाल कंदील ठरली. साखरपेंडी याच्या कितीतरी अगोदर जागी व्हायला हवी होती. आमच्या गांवांत निम्याहून अधिक वस्ती मुसलमानांची होती. इतरत्र प्रत्यहीं होणारी ही विटंबना साखरपेंडीच्या वाट्यास कशा-वरून येणार नाहीं ? त्याचीं स्पष्ट चिन्हं दिसत होतीं. मुसलमानवाडा नुसता उकळत होता. " लढके लेंगे पाकिस्तान ! " नौखालीची ही घोषणा दिवसांतून कितीतरी वेळां ऐकूं येई. आमच्या वस्तींतून रात्रीं-अपरात्रीं 'अल्ला हो अकबर'च्या आरोळ्या ठोकीत मिरवणुका निघत. अशा प्रसंगींचा शेरल्लीचा मस्तवालपणा चीड आणणारा होता. आतां तो म्हातारा होता. पण मुसलमानाची मगरुरी तो कबरस्तानांत जाईपर्यंत कधींच कमी होत नाहीं. कोण जाणार हटकायला ? साखरपेंडींत सुऱ्यांची आयात मोठ्या प्रमाणावर झाली आहे असं सर्वत्र बोललं जात होतं. या साऱ्या बनावाच्या बुडाशीं एकाच व्यक्तीचं नाव घेतलं जात होतं—

" शेरल्ली ? "

" नाहीं ! "

" कादर अबदुलमियां तेली ! "

या साऱ्याचा अर्थ मला कळेना. समजा पाकिस्तान आलं तरी सर्व बाजूंनीं हिंदूकडून वेढल्या गेलेल्या साखरपेंडीच्या मुसलमानाना त्यांत काय

मिळणार होतं ! पाकिस्तानचा शास्त्रीय विचार मी कधीं केला नाहीं. आज एवढ्या गोष्टी झाल्या, प्रत्यक्ष पाकिस्तान आलं तरी त्याचा मी विचार केलेला नाहीं. तेवढी कुवत माझ्यांत नाहीं. मी आपला ' गांवठी ' दृष्टीनं या साऱ्या प्रश्नाकडे पाहातों. पाकिस्तानविषयक कितीतरी वाङ्मय आजवर माझ्या वाचण्यांत आलं होतं. मला वाटायचं--मागताहेत ना पाकिस्तान ! देऊन टाका-क्षणाचा अवकाश न लावतां देऊन टाका. पावटयाच्या निमित्तावर टेकलेले हे लोक एकदां विभक्त झाले तर रस्ता एक मार्गी तरी होईल.

पण आमच्या पुढचं लाचार वाङ्मय, वक्तव्यं वाचून मात्र मला चीड यायची !

—" मुसलमानांनों ! कां बरं तुम्हीं पाकिस्तान मागतां ? आपल्या उभयतांच्या संस्कृतीचीं मूल्यं एकच आहेत. बंधो ! तुमच्यापैकीं पुष्कळसे बाटये आहेत. आम्हीं त्यावेळीं कांहीं बोललों नाहीं. याचं कारण सरतेशेवटीं आपण सारे हिंदीच ना ? परमेश्वराला अल्ला म्हटलं काय नी शंकर म्हटलं काय तें आदितत्त्व सरतेशेवटीं एकच नाहीं का ? मग असं कां बरं ? शिवाय पाकिस्तान आर्थिक दृष्टया अशक्य होईल. तुम्हीं अधिक गरीब व्हाल. लष्करी दृष्टया आपण दोघेहि कमकुवत होऊं. आपला हिंदीस्थान अखंड राहिला तर साऱ्या आशियाच-नव्हे साऱ्या जगाचं नेतृत्व घेण्याइतकं सामर्थ्य त्याच्यांत येईल. सर्व दृष्टीनं पाकिस्तानांत तुमचंच अकल्याण आहे. धार्मिक पायावर आधारलेलं राष्ट्र ही कल्पनाच मध्ययुगीन आहे— "

आणि तो म्हणतो--

" लढके लेंगे पाकिस्तान ! "

असल्या रडारडीनं आमच्या सामर्थ्याची जेवढी बदनामी झाली तेवढी दुसऱ्या कशानंहि झाली नसेल. मुजोरीला काऊचिऊची भाषा कां वापरली जावी, माझ्या अल्पमतीला कधीं कळलं नाहीं. पण मी तिथंच

थांबत असें. माझ्या नित्याच्या व्यवहारांना या मतांची झळ कधीं लागली नाहीं. " आपलंच आपल्याला फार झालं, त्यांत आणखी देशाची काळजी कुठची करतां ! " असं मला वाटे. माझा हा माफक संसारी दृष्टीकोन सत्तेचाळीसपर्यंत कायम होता. या सालीं मात्र सारं विश्वच जणूं वन्हिमय झालं. त्यांतून मी सुटणं शक्य नव्हतं.

* * *

: १८ :

साखरपेंडीच्या हिंदूंनीं मानरक्षणार्थ झटावं म्हणून एथपासून पुढं मी अविश्रांत धडपडलों. प्रसंगीं आगींत उड्या घेतल्या. लहानपणाचा बेछुट, बेडर रघ्या पुन्हां एकवार मूर्तिमंत वर आला. पाकिस्तानच्या मागणीपेक्षां सुद्धा ज्या मुजोर मार्गांचा अवलंब मुसलमानांकडून केला जात होता त्याची चीड मला अधिक आली होती. या चिडींतूनच साखरपेंडीचा कडवा प्रतिकार उभा राहिला.

साखरपेंडीची परिस्थिति दर दिवशीं बिघडत होती. त्या बिघाडांत योजना होती. मोटार वहातूक सर्वस्वी मुसलमानाच्या हातांत होती. मुंबईहून येणाऱ्या मोटारींतून सुऱ्यांची पार्सलं येत असतात अशी दाट बातमी होती. मोटारनं प्रवास करण्याचं लोक टाळूं लागले. काय नेम सांगावा ! सावित्रीच्या पुलावरून येतांना मोटार नदींत ढकलली तर घ्या काय ! देवीच्या देवळावर मुसलमान जमावाचा हल्ला होणार अशा बातम्या उठत होत्या. काळोख पडल्यावर रहदारी बंद होऊं लागली. मुसलमान-वाड्यांतून सावित्रीच्या खाडीवर जाणं जवळ जवळ साफ थांबलं. गेलं तरी लोक मागं पुढं पाहात जायचे. उस्मानच्या होडींतून खाडीपलिकडे जायला लोक कचरूं लागले—यानं होडी मध्येंच बुडवली तर !

यांतील कित्येक अफवा होत्या. अफवांना नुसता ऊत आला होता. असल्या अफवा पसरवून आपली आपणच बदनामी करून घेत आहोंत इकडेहि कुणाचं लक्ष नव्हतं. कांहीं नुसतीच भीति होती. भिण्याचे कामांत

हिंदु लोक कुणाला हार जाणार नाहींत ! कोणी तरी अफवा सोडायची गावांत—झाडून साऱ्या बाया, बाप्ये, बापडे, यांनीं घोळून घोळून चर्चा करायची. आणि शेवटीं ? शेवटीं भ्यायचं ! एवढा तगडा कोळीवाडा—नुसते मासे कापायचे सुरे घेऊन बाहेर पडला तरी मुसलमानवाड्याला भारी पडता. पण मग भ्यायचं कोणी ? संकट अंगाशीं बिलगत होतं. आणखी स्वस्थ बसणं म्हणजे आत्मनाश होता. या परिस्थितींत काय करायला पाहिजे याचा विचार करीत मी माजघरांत पडलों होतों. आत्या मला शोधीत आली.

" रघुनाथा, गांवांत काय बातम्या उठताहेत ऐकल्यास का ? कठीण काळ आला बाबा. लक्ष्मीला नी छोटूला तिच्या माहेरीं तरी पाठव गूळपेंडीला. "

अगदीं हेंच करायचं आतां माझ्या मनांत आलं होतं. यापुढं कांहीं दिवस कसलीहि काळजी मला नको होती. मीच बायकापोरांना हलवायला सुरवात केल्यावर अधिकच घबराट पसरणार होती. पण लहान प्रमाणावर पळापळीला सुरवात झालेलीच होती. धोंडूमामा बापट, काका शिंत्रे, शिरूभाऊ किडमिडे—बऱ्याच मंडळींनीं आपल्या मंडळींना बाहेरगांवीं पोचविलं होतं. चीजवस्तु तर कोळीवाड्यांतील लोकांनीं सुद्धां लांबवली होती. गांव अगोदर उजाड, ओका होत होता. माझ्याकरितां परिस्थिति थांबली नव्हती. ' रघुदादांनींसुद्धां मंडळींना गुळपेंडीला पाठविलं रे ! ' म्हणून थोडीफार चर्चा होणार होती. पण त्याला इलाज नव्हता. छोटूला न् त्याच्या आईला मी गुळपेंडीला पाठवायचं निश्चित केलं.

आणि बांधबांधीला सुरवात झाली ! पडदणींतील सारीं लुगडीं, दागिने, बायकोनं भराभर गोळा केले. एकीकडे ती चिडली होती. माहेरीं जायला स्त्रीनं नाखूष असणं यासारखं सासरच्या चांगुलपणाला दुसरं प्रशस्तीपत्र नाहीं ! वाटेल ते लाड पुरवणारे भाऊ असतांनासुद्धां वार्षिक माघारपणाशिवाय माझी बायको कधीं माहेरी गेली नाहीं. आतां तर तडकाफडकी बेत होऊन तिला जायची तयारी करावी लागली होती.

चरफडून घेतील अशीं दोनच माणसं स्त्रीला असतात-एक नवरा न् दुसरं पोटचं पोर. पैकीं मी थोडासा तिरशिंग्या. एका मर्यादेपर्यंत बायको चरफडली तरी मला चाले-नव्हे आवडे. बऱ्याच दिवसांत बायको माझ्या-वर चिडली नाहीं म्हणजे मला ओकं वाटूं लागतं. मग गुळपेंडीच्या तिच्या भावासंबंधी कांहींतरी वाकडं तिकडं बोललं म्हणजे माझी हौस पुरी होते. पण हें सारं एका मर्यादेपर्यंत. ती मर्यादा ओलांडली म्हणजे मग मी कोणाचा नाहीं. तोंडाला येईल तें बोलतों—मग ऐकून घेणाऱ्या माणसाला किती लागेल याचा विचार मला नाहीं. उरला छोटू. तो काय सर्वस्वी तिचाच! त्याच्यावर ती भरपूर चरफडून घेत होती.

छोटूला काय—मामाकडे जायचं म्हटल्यावर तो जो उड्या मारीत सुटला! शेजारच्या पोरांना बातमी सांगून पार. नुसता नाचत होता तो. त्याची आई सारीं अवधानं सांभाळून सामान गोळा करीत होती. तुरीची डाळ घे, हरभऱ्याची डाळ घे, गूळ घे—या टंचाईच्या दिवसांत 'घे' काय नको? शेवटीं खोबरेलाची भरलेली बाटली आणि पित्ताची मात्रा घ्यायची राहलीच! विसरायला होईल म्हणून मुद्दाम दोन्ही वस्तु ओटी वरच्या लोट्याच्या कोनाड्याशीं आणून ठेवल्या होत्या बायकोनं. विस्मरणा-मुळं थोडासा कां होईना घोटाळा झाला नाहीं तर तो प्रवास कसला? बायकोची अशा रीतीनं घणाघाई चालू होती. त्यांत छोटूचं सारखं टुमणं चालू होतं कांहींतरी. सारे नवीन कपडे, चेंडुफळी, खेळांतील पावडं-कुऱ्हाड; अभ्यासाचीं सारीं पुस्तकं, पाटी-पेन्सील-एक मोठी थोरली टोपलीच त्यानं भरून आणून ठेवली त्याच्या आईपुढ. तिनं तो संसार पाहिला आणि बोलायला सुरवात केली—

"थांब हो मेल्या-दादुमियाच्या जत्रेसाठीं चाललों वाटलं की काय तुला? ठेवून दे अगोदर सारं. हीं नवीं पुस्तकं घ्यायचीं नाहींत बरोबर. मोठा आलाय अभ्यास करणारा."

"अगो लक्षुमी, एवढं सामान जास्त का होणार? त्यानं आणखी भोकाड पसरलन् तर काहीं सुचायचं नाहीं. ठेव कोंबून कुठं तरी. छोट्या

—पुस्तकं चुरगळलीं तर रडायचं नाहीं हं ? नाहींतर गुळपेंडीला गेल्यावर दंगा करायला लागशील. थोबाड ग लक्ष्मी."

एकेक सामान बायको आणीत होती. शेवटीं जेव्हां देवांना पुरचुंडींत बांधून आणलंन् तेव्हां मात्र मी थंडा झालों. कोपरापासून तिला हात जोडले.

"माझे आई, हें काय आणलं आहेस ?"

"इश्श्—एवढं वैतागायला काय झालं ? देव आहेत ते."

"तोच अंदाज केला होता मी. घराची धर्मशाळा करायचा विचार आहे का तुझा ?"

"सासूबाईंना विचारावं—त्यांनीं सांगितलं आहे."

"आत्या, तूं सांगितलंस हिला देव घ्यायला ?"

"हो. कां रे ? नकोत कां घ्यायला ?"

"कशाला न्यायला पाहिजेत ?"

"अरे, एकेक बातम्या सांगतां 'केसरींतल्या,' देव तरी नकोत विटाळायला—?"

"आत्या, जुनं जग मेलं आतां. देवांना पळवून नेऊन त्यांचं शुचित्व नाहीं राह्यचं—तशानं ते विटाळतील. देवांचं संरक्षण करतां करतां मी मेलों आणि नंतर देवांची वाटेल ती विटंबना झाली तरी देव सोंवळेच राहातील."

"एकेक वेडंविद्रं नको बोलूं. नकोत ना न्यायला ? लक्ष्मी ठेवून दे देवघरांत."

बायको देवघरांत देव ठेवायला गेली. धबक्यांचे आवाज बाहेर ऐकूं आले. आणि भोकाड पसरलेला छोटू आणि बायको माजघरांत आली.

"काय झालं रे छोटू ? आईचं न् तुझं भांडण अजून मिटत नाहीं का ?"

" मला सायकल पायज्ये कादरकाकांनीं दिलेली. आई म्हणते न्यायची नाहीं तिकडे. "

" कांहीं नको ती मुसलमानाकडची सायकल. मेल्यांनीं धांवपळीची वेळ आणल्ये इथं, नी या बावळटाला तीच सायकल हव्ये. थोबाडीन् रडलास तर. कांहीं न्यायची नाहीं सायकल–" बायको जळफळून बोलत होती.

" शू–शू–शू—अग हो पण हळूं जरा. वडयाचं तेल वांग्यावर नको काढूं. कादरचा न् या धांवपळींचा काय संबंध ? "

" तेच आहेत या साऱ्याच्या मागं—"

" गप्प बसशील कां तूं ? कोणीहि यावं, चाहेल त्याचं नांव सांगावं न् आपण त्याला फांशी द्यावं यांत काय मजा आहे ? "

" कांहीं बोलायला नको कड घेऊन. सारं जग म्हणतं तें खोटं न् तुम्हीं म्हणतां तें खरं, असंच ना ? मुंबईहून आल्यापासून काय उद्योग चालले आहेत त्यांचे माहीत आहेत का तुम्हांला ? तुम्हांला भेटी देतात, गोड गोड बोलतात, आवडेल कशाला असलं बोलणं. "

" हें पाहा, आतां तूं फार बोलायला लागलीस— "

" मी कशाला ? सारी साखरपेंडी बोलत्ये तें मी नुसतं सांगतें तुम्हांला. "

" काय बोलत्ये साखरपेंडी ? "

" हा आग लावायला निघाला तरी तुम्हांला कसं चालतं सारं म्हणून ! "

" त्या साखरपेंडीला म्हणावं––रघु बेंद्रेला काय चालतं न् काय चालत नाहीं कळेल लवकरच. त्याच्या मागून जायची तयारी ठेव म्हणजे झालं. "

" अगो लक्ष्मी, तूं कशाला तापत्येस एवढी ? कादरला प्रत्यक्ष कुणी पाह्यलंय का ? सारे बोलतात म्हणून आपण बोलायचं यांत काय अर्थ आहे ? "

" तें कांहीं असलं तरी सायकल घेऊं देणार नाहीं मी छोट्याला. रहूं दे नाहींतर आणखी कांहीं करूं दे. "

" छोटूची सायकल राहूं दे का ? आणि हसिनेनं दिलेली रेशमी साडी ? "

" ती माळ्यावरच्या मोडक्या देवदारी पेटींत ठेवली आहे. खालीं उंदीर खाणार नाहींत म्हणून-- "

" चू-च-च् ! आत्या, काय ऐकतोय ग मी ? "

" रघुनाथा, तूं आतां जरा शांत होशील का ? बाहेर जा, नी गाडी जुंप पाहूं दिवस लहान आहेत. उशीर होईल. मागाहून पिन्याच्या घाटीं-तून जाणार आहांत ना ? मग वेळ मोडूं नको उगाच. "

" लक्ष्मी आतां पुरे कर. नाहींतर पुन्हां पटपटायला सुरवात कर-शील. तो संतापेल. सांगून ठेवत्यें. जातांना एक शब्द बोलूं नको याबद्दल. त्याचंसुद्धां बरोबर आहे. तुला माहीत नाहीं लहानपणापास्नं कादरच्या बापाचा केवढा लोभ होता त्याच्यावर तें. पोरासारखं कौतुक झालंय त्याचं कादरच्या घरीं. वाईट वाटतं माणसाला असं भलतंच कांहीं ऐकलं कीं. खरं-खोटं. आपल्याला करायचंय काय ? चला, निघा. पुरे-पुरे. अष्टपुत्रा सौभाग्य लाभूं दे माझ्या बाळीला. " बायकोनं आत्याला नमस्कार केला आणि आम्हीं बाहेर पडलों. आम्हीं गाडींत बसलों. आत्या पुन्हां कवाडीशीं आली.

" लक्ष्मी, पैसा-सुपारी ठेवल्येस का बाहेर सावित्रीला द्यायला ? नाहींतर खाडीशीं जाल नी लागाल शोधायला. "

" आजी, जातों- " बऱ्याच वेळानंतर छोट्या बोलला.

" सावकाश. त्रास नाहीं द्यायचा हं आईला, काय ? अनी लक्ष्मी–त्याला धक्कूं नको. "

भुर्रकन आमची गाडी सुरु झाली. आत्याचे शब्द गाडीमागं उधळलेल्या धुरळ्यांत लुप्त झाले. प्रत्येक कवाडींत कोणीतरी उभं होतं आम्हाला पाह्यला !

" रघुदादांनीं बायकामंडळींना हलविलं ! —साखरपेंडीची परिस्थिती भीतिदायक झाली. याला आणखी पुरावा कोणता पाहिजे ? "

साखरपेंडी बोलूं लागली !

गुळपेंडीला बायकोला पोंचवून दुसऱ्या दिवशीं संध्याकाळीं मी साखरपेंडीला परत फिरलों. बायकोला माहेरीं ठेवून येतांना कोणाला वाईट वाटत नाहीं ? त्यांत आणखी छोटूसारखा गोड पोरगा असल्यावर तर ती व्यथा काय वर्णावी ? छोटूच्या सहवासाला मीं मुकणार होतों ? किती दिवस ? कुणी सागावं ? परिस्थिति इतकी अनिश्चित होती कीं असले अंदाज बांधणं कठीण होतं. तिथून निघतांना याची जाणीव मला झाली. निघायच्या वेळीं बायको पुढं आली. तिचे डोळे भरले होते. थोडंसंच ती बोलली––

" डोकं तापवून नाहीं घ्यायचं-हं, नाहींतर साऱ्या साखरपेंडीची काळजी कराल नी आम्हांला काळजी करायला लावाल. नी मी बोलल्यें तें डोक्यांत नाहीं ठेवायचं. रागाच्या भरांत कांहींतरी बोलल्यें. "

" कुणाला ठाऊक ' कांहीं तरी ' बोललीस कीं परमेश्वरानं तुझ्या तोंडून कांहीं सुचविलं ? मलासुद्धां थोडा फार संशय येत आहे–पण खरं सांगूं कां ? प्रेमाच्या माणसांविषयीं कांहीं वेडंवाकडं असलंच तर निदान त्याचा उच्चार तरी होऊं नये अशी इच्छा असते माणसाची. तें जाऊं दे. तुझे डोळे असे भरून कां आले आहेत सांग पाहूं ? मी कुठं लढाईवर कां चाललों आहें ? " तिचे डोळे अधिकच भरून आले.

" हें पहा, तूं असं करणार असशील ना तर मी जाणार नाहीं इथून. डोळे पूस पाहूं आधी. चांगले पूस. हां! आतां हांस एकदां."

" इश्श्, पाहिलं कुणीं तर काय म्हणेल?" न् बायको खरोखरच खुद्कन हंसली!

" बस्स! जातों आतां मी. छोटूला जप, अन् मारूं नको त्याला."

गुळपेंडीहून मी निघालों.

खाडीवरून जायचं मी मुद्दाम ठरविलं. मुसलमानवाड्याविषयीं अनेक गप्पा साखरपेंडीला उठत होत्या. कादरचं नांव तर सारखंच घेतलं जात होतं. प्रत्यक्ष एकदा पाहून घ्यायचं मी ठरविलं. खाडीशीं आलों. उस्मानची होडी पलीकडे गेली होती. तिथंच भेंडीच्या झाडाशीं मी बसलों. इणैहून बोटीचीं माणसं येऊं लागलीं होती. भली थोरली ट्रंक घेऊन महादु बटावळा येत होता.

" काय रे महादु—भारीसा काय पेटारा आणला आहेस?—"

" कादर तेल्याचा हाय दादा. हुमैसून आलाय."

" मग कादर पण आहे कीं काय?"

" व्हय तर. थक्ड हायत. होडीची वाट बघतायत."

कादरनं मला पाहिलं. तो माझ्याकडेच येत होता.

" कादर!"

" रघु!"

किती विलक्षण मनःस्थितींत आम्ही भेटत होतों! आमचं प्रेम अभंग होतं. निर्विवाद अभंग होतं. ज्या आर्तस्वरांत कादरनं मला हांक मारली, ज्या आर्तस्वरांत मी त्याला बोलविलं, त्या स्वरांत उभ्या विश्वाची असहायता सांठविलेली होती. दोघेहि पक्कं जाणून होतों—परस्परांच्या रक्ताला चटावलेल्या दोन जमातींचे घटक म्हणून लवकरच आम्हांला समोरासमोर उभं रहावं लागणार आहे. काय वाटेल तें झालं तरी आमच्या प्रेमाशीं आम्हीं बेइमान होणार नव्हतों. काय वाटेल तें झालं

तरी आमच्या जमातीशीं आम्हीं बेइमान होणार नव्हतों! किती नाजुक, किती अवघड जबाबदारी नियती आमच्यावर लादूं पहात होती! हीच—हीच असहायता आमच्या आर्तस्वरांत ओथंबली होती.

"रघु, तूं यायचं टाकलंस आमच्याकडे?"

"कादर, ऐकतोयसना साखरपेंडीला काय गप्पा उठताहेत त्या? धूर येत आहे म्हटल्यावर विस्तवाची उठाठेव कशाला? काम पण निघालं नाहीं कांहीं——"

"एवढा भित्रा केव्हांपासून झालास?"

"भित्रेपणाचा प्रश्न कुठं आला कादर? तूं तरी आलास का माझ्याकडे?"

"हें वकिली बोलणं नको आहे मला. कांहींतरी बोलून तोंड बंद करायचं ही विद्या कुठं पैदा केलीस तूं? सरळ सांग ना तुला यायचं नाहीं माझ्याकडे तर."

"तुझ्यांत एक विचित्र फरक झाला आहे कादर. एवढ्याशा गोष्टींत चिडतोस किती? आटा ढिला झाला आहे कां तुझा?"

"मी चिडतों म्हणून म्हण पाहिजे तर, पण खरं तें मी बोलतों आहें."

"तूं म्हणतोस तसं! तें जाऊं दे. तुझी तब्येत कशी आहे? बरी दिसत नाहीं म्हणून विचारीत आहे हं. नाहींतर तुला वाटायचं—"

"च्, असं भलतंच वाटायला मला वेड लागलं नाहीं. माझी तब्येत तशी बरी आहेरे—पण डोक्यांत मधूनच गलबलायला लागतं न् डोकं दुखतं. ॲस्प्रोच्या गोळ्या चेपल्या कीं बरं वाटतं."

"भलतींच कांहीं औषधं घेत नको सुद्धं. ॲस्प्रो छातीला चांगलं नाहीं फार खाणं, ठाऊक आहे ना? मार्टीनसाहेबांकडे येतोस का? दाखवून घेऊं एकदां. डोळे तर नाहीं बिघडले?"

"कुणास ठाऊक! ढकलतोय सध्यां."

" भाभीला येऊन सांगितलं पाहिजे एकदां-- "

" काय-- ? "

" कीं लक्ष देत नाहींस कादरकडे. "

" रघु, हसिनेसारखी बाई नाहीं मिळायची नवऱ्याची काळजी घेणारी. "

"तें मला माहीत आहे म्हणूनच विचारायचं आहे. चल तुझ्याकडेच येतों मी. तुझ्याजवळ बोलण्यांत कांहीं अर्थ नाहीं. "

आम्हीं होडींतून पलीकडे उतरलों. ट्रंक दोघांनीं धरून रस्त्यावर आणली.

" भारीशी काय जड लागत्येरे ? "

" हा आमचा मुंबईचा संसार हलवतोंय बाबा. काय करायचं वेळ आली ना ! "

कादरचं उत्तर ऐकलं मी न् कुठचं विचारलं असं झालं मला.

कादरच्या घरीं जवळ जवळ जवळ दीड महिन्यांत मी जात होतों. पंचवीस वर्षांपूर्वी वडाखालीं कादरला भेटलों त्या दिवसापासून आजमितीला असं कधीं झालं नव्हतं. कांहीं कांहीं गोष्टी आपल्या हातून घडतात अन् नंतर आपलं आपल्यालाच वाटूं लागतं— ' हें झालं तरी कसं ? ' कितीहि अहेतुक असलं तरी गेल्या बरेच दिवसांत कादरकडे मी गेलों नाहीं हें खरं. आम्हीं शेताडींतून चालत होतों. लांब अंतरावरून इकबलनं मला पाहिलं आणि ती 'मोठी' बातमी जाहीर करायला तो घराकडे पळत सुटला. आम्हीं घराशीं येत आहोंत तों भाभी, अम्माजान, आमचं स्वागत करायला पुढं आल्या होत्या. इकबलच्या अंगांत जणूं वारं शिरलं होतं. " दादा आले, दादा आले—दादा आले ! " म्हणून तो उड्या मारीत होता. इकबलची हंसरी मूर्ति मी पाहिली आणि विजेसारखी मला आठवण झाली.--

" खाऊ ! रघु, इकबलसाठीं खाऊ कुठं आहे ? लवकरच ते इवलाले हात तुझ्यापुढं येणार आहेत. काय ठेवणार आहेस त्या हातांवर ? मूर्ख

माणसा— व्यवहार चुकायलासुद्धां सीमा असते. आतां अडखळून कांहीं उपयोग नाहीं. जा ! तसाच जा रिकाम्या हातीं " शरमिंधा होऊन मी चालत होतों. अम्माजाननीं मला पाहिलं आणि गहिवरून आलं त्यांना.

" रघ्बा, मालिक गेले म्हणून विसरलास का रे आम्हांला ? "

एकदम पुढं होऊन मी अम्माजानचे पाय धरले.

" नाहीं, नाहीं अम्माजान. असं नका बोलूं. तुमच्या रघ्बांतील माणुसकी नाहींशी होईल तेव्हांच तो विसरेल तुम्हांला. तुमची तब्येत बरी नाहीं दिसत अम्माजान ? न् भाभी तूं सुद्धां किती वाळली आहेस ? "

भाभीच्या डोळ्यांत पाणी उभं राहिलं.

" असं रडून कसं चालेल भाभी ? हेहि दिवस जातील. तुम्हीं कुणाचं वाकडं केलेलं नाहीं जगांत, हें लक्षांत असूं द्या. परमेश्वराला त्याचा विसर नाहीं पडायचा. एवढयाशा प्रसंगानं डगमगायला लागलांत तर कसं होणार ? मियांनीं कसे दिवस काढले कादरला विचार. "

इकबल भेदरलेल्या दृष्टीनं सारं पाहात होता. अम्माजानचे डोळे भरले. भाभीचे डोळे भरले—काय प्रकार आहे हा ? त्याला कांहीं कळेना. मी त्याच्याकडे पाहिलं. माझी नजर त्याच्याकडे वळण्याची तो वाटच पाहात असावा. त्यानं धांवत येऊन मला विळखा घातला.

" दादा, आतां जाऊन देणार नाहीं तुमाला—"

" मी कुठं जाणार आहें इकबाल ? मी इथंच राहाणार आहें. "

" खोटं सांगतां तुमी. मी सोडणार नाहीं तुमाला आतां. " इकबलला उचलून मी वर घेतलं आणि त्याचे मनसोक्त पापे घेतले. तें बालमन जरा वेळांत खाली उतरलं आणि विसरलं मला.

अम्माजाननीं दहा बारा लव माझ्यापुढं आणून ठेवले.

" रघ्बा, हातणीजवळचे आहेत आज सकाळींच पाडले. खरी माया असली म्हणजे माणूस कसं बोलावल्यासारख येतं पाहा. सकाळीं लव पाडले आणि दहा वेळां आठवण काढली तुम्ही. "

" किती खरं बोललांत अम्माजान. कादर आपल्याला मिजास वाटावी अशा अनेक गोष्टी आपल्या कोंकणांत आहेत. हा लव त्यांतलाच एक आहे असं मला नेहमी वाटतं. काबूलच्या अलुबुखारनं आपल्या लवापुढं तरी ऐट दाखवूं नये. मुंबईला मिळतो कारे ? "

" कुठं पाहिला नाहीं बुवा. एकदां क्रॉफर्ड मार्केटांत पाहिलं होतं असलं फळ. मुद्दाम मी विकत सुद्धां घेतलं. मागून पाहिलं तों कानडांतलं कीं कुठलंसं निघालं तें. "

" अम्माजान. लव फार सुरेख आहे हं. "

" रघ्बा, ते बाजूला नको ठेवूं. घरीं न्यायला दिले आहेत तुला. तूं आलास तें बरं केलंस बाबा. निरोपच पाठविणार होतें. तूं तरी सांग कादरला कांहीं. एक दोन दिवसाआड त्याचं डोकं दुखतं. चिडका इतका झाला आहे नुसतं औषध घे सांगायची सोय नाहीं. "

" हेंच सांगायला म्हणून मी इथं आलों अम्माजान. त्याला सांगतों आहें डॉ. मार्टीनकडे जाऊन येऊं आपण–कांहीं वेळां नुसते डोळे बिघडलेले असतात आपले न् त्यामुळंसुद्धां डोकं दुखत राहतं. त्याला ॲस्प्रो खाऊन काय होणार ? पण पटत नाहीं त्याला. "

" अल्लाची मर्जी बाबा ! दुःख सोसायची ताकद राहिली नाहीं माझ्यांत आतां रघ्बा. किती दिवस राह्यले असतील ते काढले पाहिजेत. "

" असं नका बोलूं अम्माजान—"

" मग काय बोलूं ? सारा दिवस उन्हातान्हांत हा बाहेर असतो. साखरपेंडीला त्याला पुन्हां धंदा सुरू करायचा आहे म्हणतो. पण आपल्या तब्बेतीला नको का जपायला ? इतकी वाईट परिस्थिती झाली आहे कारे आमची—दुखणं–पाखणं न पाहतां यानं काम करीत सुटायला ? "

अम्माजान बोलत होत्या. त्यांची दृष्टी कावरीबावरी होऊन वैभवशाली भूतकाळांत कुठं तरी धडपडत होती. आज मियां गेले, धंदा गेला. देशांत

राहून देशोधडीला लागल्यासारखी त्यांची परिस्थिती झाली होती. आणि कादर म्हणत होता—

"माझी जिंदगीच काय पण मी सुद्धां निघून जाईन !........."

अम्माजान ! दुर्दैवी जीवा, आतां हें जीहाद सुरू झालं आहे ! काय विचारतां–जीहाद म्हणजे काय ? किती वेडा प्रश्न ! जीहादचा अर्थ तुम्हांला कळत नसेल तर फिकीर नाहीं. किंबहुना तुम्हांला त्याचा अर्थ न कळणं बरं. समाजसागरांत आतां जीहादच्या पवित्र लाटांशिवाय तुम्हांला कांहीं एक दिसणार नाहीं. त्या पवित्र लाटा तुमच्यासारख्या असंख्य जिवाणूंची काळजी घेतील. त्या नेतील तिथं, नेतील तसं आणि नेतील तेव्हां तुम्हांला फक्त जायचं आहे ! कां ? कुठं ? कशाला ? नका हे प्रश्न करूं.

"इतकी वाईट परिस्थिती झाली आहे कारे आमची ?"

त्या वृद्ध जीवाचा तो प्रश्न ! व्याघ्रहृदयहि विरघळून गेलं असतं त्यानं.

काय सांगूं अम्माजान तुम्हांला !

विश्वासांतील माणूस भेटल्यावर दुःखी जीव आपलं दुःख भडाभड ओकूं लागतो. कांपत कांपत विलग होणाऱ्या त्या सुरकुतलेल्या ओठांतून आणखी काय बाहेर पडणार होतं ? धडधडत्या अंतःकरणानं मी वाट पहात होतों. अम्माजानच्या डोळ्यांतून अश्रु ठिबकत होते. कोणांत सामर्थ्य होतं ते अश्रु थांबविण्याचं ? अनादिकालापासून हे अश्रु ठिबकत आले आहेत. त्या एकेक खारटतुरट जलबिंदूंत उभ्या विश्वाची दुःख–कथा सामावली होती. आज किती घरांतून हे अश्रु दुःखाला वाचा फोडीत असतील ! किती लोकांना हे अश्रु सूडाचा संदेश देत असतील ! कल्पना करतां येणार नाहीं एवढं सामर्थ्य त्या अश्रूंत होतं ! प्रचंड शक्तीपुढं पामरानं लीन होऊन उभं रहावं तसा मी तिथं उभा होतों. अम्माजान ! आतां या अश्रूंनींच तुम्हांला आपलं दुःख हलकं करावं लागणार आहे !

नवाच्या सुमारास मी कादरच्या घराहून निघालों. जिकडे तिकडे शुकशुकाट झाला होता. नाक्यावरच्या शेरलीच्या हाटेलाशीं मात्र नेहमीं-

प्रमाणं वर्दळ चालूं होती. पेट्रोमॅक्सच्या प्रकाशांत सिगरेटचा धूर काढीत बरीच मंडळी तिथं बसली होती. झपाझप पावलं टाकीत मी नी कादर कोळीवाड्याचा तिठा गांठला. अम्माजानच्या अश्रूंनीं आम्हीं इतके वितळून गेलों होतों —तिठ्याशीं येईपर्यंत फारसं बोललोंसुद्धां नाहीं. बधिर होऊन गेलों होतों आम्हीं. तिठ्याशीं आलों तेव्हां सर्वत्र काळोख आणि शांतता पसरली होती. मसणबिर्दीतून वारं आंत घोंगावत येत होतं. आंब्याच्या पानांची होणारी सळसळ, मसणबिर्दीतून येणारं कोल्ह्याचं ओरडणं आणि कुत्र्याचं भेसूर रडणं हींच काय तीं त्या भयाण शांततेचा भंग करीत होतीं.

“ कादर, तूं जा आतां. मी जाईन. ” कादरला मी सांगितलं आणि आम्हीं एकमेकांचा निरोप घेतला. आमचे दोघांचे डोळे भरले होते. शब्दांनीं न सांगतां येणारी कथा त्या चार डोळ्यांनीं एकमेकांना सांगितली होती !

* * *

## : १९ :

साखरपेंडीची परिस्थिति आतां कोणाकरितां थांबायला तयार नव्हती. बेगुमानपणं ती पुढं चालली होती. गूळपेंडीहून मी परत आलों आणि दुसऱ्याच दिवशीं देवीच्या देवळाशीं गांवकी घेतली. असली गांवकी साखरपेंडीनं यापूर्वी पाहिली नव्हती. गांवकी म्हणजे फक्त ब्रह्मवृंदांची सभा एवढंच समजलं जात होतं. आजच्या गांवकीला झाडून सारा कोळीवाडा, कुणबी, सोनार––जो जो म्हणून हिंदु होता तो तो तिथं आला होता. सदु महारसुद्धां त्यांतून वगळला नव्हता ! नेहमीच्या गांवकींत धोंडूमामा बापट, काका शिंत्रे वगैरे मंडळी पुढं असायची. आजच्या गांवकींत रघु भेंद्रा, काश्या कोळी, गणपत कोळी, महादु बटावळा, हे पुढं होते ! जुनं झपाट्यानं मरत होतं. जुनीं मूल्यें खतम् झालीं होतीं. आजचा पहिला मानकरी काश्या कोळी होता, दुसरा मानकरी रघु भेंद्रा होता, तिसरा मानकरी महाद्या बटावळा—साऱ्या साखरपेंडीनं ज्याची 'दारुड्या' म्हणून हेटाळणी केली तो महाद्या बटावळा होता ! दर एकादशीला लघुरुद्र करणारे काका शिंत्रे इथं जमेंत नव्हते, दररोज न चुकतां दुपारीं बारा वाजतां सोवळ्यानं देवीची पूजा झाल्याशिवाय अन्नग्रहण न करणारे धोंडूमामा बापट आज एका कोपऱ्यांत होते. देवीची, साखरपेंडीची अब्रू स्वतःचं रक्त देऊन रक्षण करणारे आज पहिले मानकरी होते. उशीरां का होईना—साखरपेंडीचे डोळे उघडत होते. पण अजून, एवढं झालं तरीसुद्धां आमचे डोळे साफ उघडले नव्हते.

सर्व मंडळी जमली. गांवकीच्या कामाला सुरवात व्हायची होती. कोण कोण आले नाहींत तें पाहयला मी सभोंवार दृष्टी टाकली. बिचारा सदु महार एका कोंपऱ्यांत बैठकीच्या बाहेर बसला होता. त्याला मी पाहिलें. शरम वाटली मला. जोरानं ओरडून त्याला मी हांक मारली.

" सदू-- ! "

" हतं हाय मी दादा. "

" थतं नको, इकडे ये. "

सदूचा चेहरा केविलवाणा झाला. त्याला काय करावं कळेना. त्यानं वांकडं तोंड करून खुणेनं मला सांगितलं--" मी इथंच बसतों. "

" तुला एकदां सांगितलं तिथं नको, इकडे--माझ्याजवळ ये. "

सभेंत गलका सुरू झाला. ब्रह्मवृंदांपैकीं जे वृद्ध होते त्यांच्यांत चुळबुळ सुरूं झाली. घोंडूमामा माझ्या कानाशीं येऊन बोलूं लागले—

" रघुदादा,-अरे तूं हें काय चालविलं आहेस ? या भ्रष्टाकाराकरितां का गांवकी बोलाविली ? आणि देवीच्यासमोर ? मुसलमान राहतील बाजूला, देवीचा कोप मात्र आवरतांना नाकींनऊ येतील. नशीब त्या अण्णांचं, हयात नाहींत आज. "

" बस्स करा मामा. जिवाशीं बेतल्यावर तरी शुद्धींत याल असं वाटलं होतं. तुम्हांला सहन होत नसेल तर उठून चला. आमच्यासारखाच सदूही संकटांत आहे. तिथं त्याला महार म्हणून कोणी ताम्रपट लिहून दिला नाहीं. जो इथं मरायला तयार होईल तो आमचा आहे. सदू आज आमच्याबरोबर जगायला आणि मरायला तयार आहे. आहेस कीं नाहीं सदू-- ? "

" त्याबिगर हतं आलांय व्हय दादा ? "

" ऐका, मामा ऐका त्याचे शब्द. तुम्हांला घड पळतांसुद्धां येणार नाहीं, कशाला तुमची आणि त्या थोर माणसाची तुलना करतां ? "

" अरे रघु. थोर कोण बाबा ? " काका शिंत्रे इतका वेळ गप्प होते, त्यांनीं मला मध्येंच विचारलं.

" सदू ! थोर माणूस सदू आहे. काका वाईट वाटण्यासारखं यांत कांहीं एक नाहीं. वख्त् बाका आला आहे. तुमच्यासारख्या माणसांनीं त्रागा करण्यापेक्षां आम्हांला आशीर्वाद द्यावा-- "

शेवटीं मी उठलों, सदूचा हात धरला आणि मी बसलों होतों तिथं त्याला आणलं. काश्या, गणपत, महादा, यांच्यासारखे थोडे लोक सोडले तर बाकीच्यांना कोणालाच तें आवडलं नाहीं ! खुद्द सदूला आवडलं नाहीं ! आम्हींच पुढाकार घेतला त्यामुळं पचलं--ओकून पडलं नाहीं एवढंच ! गांवकी थोडया गरम वातावरणांत सुरू झाली; पण नंतर सारं सुरळीत पार पडलं.

आतां गांवांतून आमच्या गस्ता सुरू झाल्या. लोकांना जागं ठेवण्यापलीकडे त्यांत अर्थ नव्हता. शहरासारखी ठराविक रस्त्यांची नाकेबंदी केली कीं झालं असं नाहीं आमच्याकडे. साऱ्या गांवाचा बंदर किनारा मोकळा होता. कोणत्याहि मुळवसांतून हल्लेखोराना प्रवेश करतां आला असता. गांवांतील प्रत्येक घराची रचनाच अशी आहे. घरांच्या मागं पोफळी-माडांचा आगर, त्याच्या मागं शेताडीचा चिंचोळा पट्टा, त्याच्या मागं कांहीं यार्डाएवढी जागा-सुरुंची झाडं आणि केतकीचीं झाडी. या मुळवसांतून चिंचोळया रस्त्यानं पुढं गेलं कीं समुद्र. या सुमारें दोनशें मुळवसाची नाकेबंदी करणं केवळ अशक्य होतं. गस्तांचा उपयोग परिस्थिति किती धोक्याची आहे हें लोकांना कळावं एवढ्यापुरताच होता. चहा ढोंसत, विडया फुंकत फिरणारे आमचेच एकेक ' गस्ती ' वीर वेळेला काय कळस करतील नेम नव्हता !

--आणि एका संध्याकाळीं अकस्मात् बातमी आली--

" कोळीवाडयाच्या भर तिठ्यावर काश्या कोळयाचा खून ! "

सारी साखरपेंडी हादरून गेली.

काश्या ! लहानपणीं प्रथम त्याला मी पाहिलं तें मारामारींत. अवघ्या एकोणीस वर्षांचा होता तो यावेळीं. त्याची त्यावेळची जिगर साखरपेंडी अजून विसरली नव्हती. लहान वय जात्याच प्रभावपूजक असतं. माझ्या हृदयांत वयाच्या अकराव्या वर्षी काश्यानं जें स्थान मिळविलं तें आजमितीला कायम आहे. एक महिन्यापूर्वींपर्यंत काश्या–मी भिन्न जगांत वावरत होतों. ' राम–राम ' करण्यापलीकडे त्याचा माझा संबंधही नव्हता. परिस्थितीनं आम्हांला जवळ आणलं. कमालीचं जवळ आणलं. कांहीं माणसांचं व्यक्तित्व एवढं विलक्षण आणि विशाल असतं–तोडीची परिस्थिति निर्माण झाली तरच त्या व्यक्तीचं वास्तवदर्शन लोकांना घडतं. काश्या अशाच माणसांपैकीं एक होता. काश्याचं खरं दर्शन नुकतंच घडूं लागलं होतं. काश्या रस्त्यानं जाऊं लागला म्हणजे लोक त्याच्याकडे आशेनं, आदरानं आणि अभिमानानं पाहूं लागत. ' साखरपेंडीचं संरक्षण करण्याचं सामर्थ्य कुणांत असलंच तर काश्यांत आहे ' असें सर्वांना वाटे. त्यांचा हा विश्वास मुळींच अस्थानीं नव्हता. इतका अशिक्षित, असंस्कृत असतांना काश्यानं संघटन-कौशल्य कुठं पैदा केलं ? मला नेहमीं वाटे. यापुढं ज्या अनेक योजना मी प्रत्यक्षांत आणल्या त्यापैकीं कित्येकांचा जन्म काश्याच्या डोक्यांत झालेला होता. काश्याचा खून हा आमच्यावर जबरदस्त आघात होता. मुसलमानांची तयारी केवढी होती याची ही पहिली चुणूक होती.

काशीरामचा मृत देह देवीच्या देवळाशीं आणण्यांत आला. हजारोंचा जमाव तिथं जमला होता. अफवा उठतच होत्या–– ' आज रात्रीं सशस्त्र हल्ला होणार ! ' मी अफवांना भीत नव्हतों. पण आमच्यांत जो घबराट शिरला होता त्याची मला चीड आली. संरक्षणाचं सर्व साहित्य आम्हीं जमा केलं होतं. सर्व योजना निश्चित झाल्या होत्या. सर्व लोक आपली कामगिरी न कचरतां पार पाडते तर कितीहि हल्लेखोर आले तरी त्यांना धडा शिकून परत जावं लागलं असतं. पण लोकांनीं कच खाल्ली तर या सान्याचा काय उपयोग होणार होता ? काशीरामला मसणबिदींतून

न्यायलासुद्धां लोक तयार होईनात ! कां ? तर मसणविदीशीं मुसलमान हल्ला करायला बसले आहेत अशी बातमी कोणीतरी आणली होती म्हणून ! काशी-रामानं वीरमरण पत्करलं; पण साखरपेंडीचे नादान हिंदु त्याला वीरदहन नाकारीत होते. संतापानं आग झाली माझ्या अंगाची. काशीरामाचा देह मी खांद्यावर घेतला. देवळांत शिरलों. देवीच्या पायावर त्याला ठेवला. त्याच्या गोठलेल्या रक्ताचा टिळा जगदंबेला लावला. स्वतःच्या कपाळाला टिळा लावून घेतला. शवाला अखेरचं वंदन केलं आणि पुन्हां काशीरामला खांद्यावर घेतलं.

" हा वीरदेह मसणविदींतूनच स्मशानावर नेला जाईल. नामर्दाची अवलाद असेल तिनं येऊं नये माझ्याबरोबर. "

आणि मी तसाच चालूं लागलों एक क्षणहि कुणाकरितां थांबलों नाहीं. माझा आत्मविश्वास, माझा त्वेष पाहून लोक स्तंभित झाले. हजारोंचा तो घोळका माझ्या मागून चालूं लागला.

" काशीरामनं क्या किया ? पाकिस्तान जला दिया ! "

अशा गगनभेदी आरोळ्या ठोकीत तो जमाव चालला होता. काशीरामला साजेशा वैभवानं त्याला आम्हीं स्मशानांत नेलं.

काशीरामच्या खुनानं मी थोडाफार खचलों; पण दुसऱ्या एका गोष्टीमुळं अधिक खचलों. देवीच्या देवळाशीं जमलेलीं हजार तोंडं एकच गोष्ट मला ऐकवीत होतीं--

" काशीरामचा खून कादरनं केला ! "

दुर्गादेवीला मी मनोभावें प्रार्थना करीत होतों--

" जगदंबे, माझी सारी पुण्याई गेली तरी फिकीर नाहीं पण ही अफवा खोटी पाड. "

गेल्या पांच सहा दिवसांत कादर मला भेटला नव्हता. गेल्या कित्येक दिवसांत त्याचं बोलणं, वागणं सारंच चमत्कारिक, गुदमरलेलं होतं.

मला वाटे या दुर्दैवी प्राण्यासारखे आघात माझ्यावर आले तर मीसुद्धां असाच वागेन. पण कादरच्या हालचालीचे धागे जुळवूं लागलों कीं वाटे- कादरनं खरोखरच हा खून घडवून आणला तर नसेल ?

पण ते दिवस असे होते--असल्या गोष्टींवर विचार करायला फुरसतच नव्हती एवढं कार्य समोर पडलं होतं. कार्य--अविरत कार्य, नाहींतर नाश ठेवलेला होता.

काशीराम गेला पण फुकाचा नाहीं. त्याचा मृत्यु त्याच्या जीवना- इतकाच प्रभावी आणि पराक्रमी ठरला. आतां साखरपेंडी तापूं लागली. मुसलमानांवर बहिष्कार पुकारण्यांत आला. नुसत्या साखरपेंडीचाच विचार करायचा असता तर या बहिष्काराला अर्थ नव्हता. भात–सुपारीचा व्यापार, मोटार वहातुक, सावकारी–साखरपेंडीच्या आर्थिक जीवनाच्या नाडया सर्वस्वी मुसलमानांच्या हातांत होत्या. खोऱ्यावारी पैसा कित्येक मुसलमानांच्या घरांत आज लोळत पडला होता. आतां तो जीहादकरितां बाहेर आला ! कुठून आला हा सारा पैसा ? आगरात झाडं लावलीं होतीं त्यानीं ? आमच्याच जिवावर पैसा कमवून तो आतां आमचे मुडदे पाडण्याकडे वापरायचा होता ! नुसती खाडीची नाकेबंदी ते करते तरी हर्णै बंदर, गुळपेंडी इकडील आमचं दळणवळण पिऱ्याच्या घाटीं- तून आम्हांला ठेवावं लागलं असतं. घरचं खाऊन घराचे वासे मोजणारे लोक सामन्याला आमच्यापुढं उभे होते. पण आम्हीं डगमगलों नाहीं. घोपडपेंडी, गुळपेंडी, वरपेंडी, गिम्हवणे-आजुबाजूच्या साऱ्या गांवांची मदत उभी राहिली. नुसतं हर्णैला जायचं तर विचार करण्याची वेळ आली मुसलमानांवर. दडून बसलेले भंडारी केव्हां हल्ला करतील, लुबाडतील नेम नाहीं असं होऊन गेलं. मुसलमानांची संपूर्ण कोंडी व्हायची वेळ लवकरच येणार होती. ‘ काशीरामचा खून ! काशीरामाचा खून ! ’ त्या वीस मैलांच्या चिंचोळया पट्टींत एकच शब्द घुमून राहिला. ‘ बदला ’ आतां

वाट चालूं लागला होता. दादूमियांचा पीर, वृद्ध वटराज, सावित्रीमाई, दुर्गामाता, महापुरुष–कोणाकोणामध्यें सामर्थ्य नव्हतं त्याला रोखण्याचं! तो कुठं, कसा जायचा हें ठरविणं मानवी शक्तीबाहेरचं होतं. औषधाच्या–मरतिकाच्या निमित्तानं मुसलमानांना बाहेर जाणं प्राप्त होतं. मी हें पाहिलं आणि ताबडतोब निश्चय केला–'नाहीं, कदापि नाहीं. या लढयांत एक-तर्फी माणुसकीला स्थान नाहीं.'

आणि आतां पुढची पायरी आली. ती फार जालीम होती. स्वजातीयांवर हात टाकण्याची ती पायरी होती. ज्या संघटनेंत द्रोह्यांना शासन नाहीं ती रसातळाला जाते. मुसलमानांशीं संबंध ठेवायचा नाहीं हें खरं; पण कुणी ठेवला तर? ठेवला तर? असली नादान अवलाद कोणी प्रसवला असेल तरी फिकीर नाहीं. बडवा त्या माणसाला! भर रस्त्यावर, चार चौघांत बडवा. भर रस्त्यावर अनेक लोकांदेखत नानाभटजी शिंत्रे–गांवांचे उपाध्याय यांना थोबाड लाल होईपर्यंत चोपण्यांत आलं! म्हातारा चिडला–शिव्या देऊं लागला. आणखी थोबाडांत! वेडे झालेले लोक हर्षातिरेकानं नाचूं लागले–नानांची धिंड निघत असतांना. त्या बिचाऱ्याचा अपराध एवढाच. चोरून मुसलमानाकडून सहा पायली भात त्यानं विकत घेतलं. नानाभटजींवर पडलेल्या माराचा प्रणेता मी होतों. एवढं मोठं सावज हातांत आल्यावर मी कसचं सोडणार! नानांचा आमचा जुना घरोबा होता. आपली साखरपेंडीची वृत्ती आपल्या पश्चात् नानांकडे जावी अशी इच्छा अण्णांनीं व्यक्त केली होती. माणूस खरोखरच सुजन होता. पण सुजन म्हणजे काय? साऱ्या शब्दांचे अर्थ, मूल्यं आतां बदललीं होतीं. आमच्यांतील सर्वांत थोर पुरुष आज काशीराम होता–आणि हाच काशीराम महिन्यापूर्वी कोणाच्या जमेंतहि नव्हता. नानांनीं भात आणलं एवढं मला कळलं मात्र, मी एकच विचार केला–"उत्कृष्ट सूतोवाच म्हणजे काम अर्धअधिक फत्ते होण्यासारखं आहे.

नानांसारखं वेदशास्त्रसंपन्न सावज हातीं लागत असतां तें सोडणं मूर्खपणा आहे. या ‘ पवित्र ’ कार्याला नानांपासूनच सुरवात होऊं दे. लोकांना कळेल समाजद्रोहाचं शासन काय असतं. ”

नानांसारख्या वृद्ध माणसावर मार पडला आणि माझ्या अपेक्षे-पेक्षां तो परिणामकारक ठरला. सगळीकडून बातम्या येऊं लागल्या. आज गुळपेंडीच्या नरूशेटला मार पडला—उद्यां वरपेंडीच्या डॉ. परांजप्यांना बडविण्यांत आलं. लहान–मोठा, गरीब–श्रीमंत या कर्तव्यांतून कोणीहि सुटत नव्हता. माझ्या तशा सक्त सूचना होत्या. आणि लोकांनीं त्या अक्ष-रशः पाळल्या ! कोंडी पुरी झाली ! साखरपेंडीच्या एका यःकश्चित शाळा मास्तराची ही कर्तबगारी पाहून सारा जिल्हा थक्क झाला !

काल कोळीवाड्यांत चार खून पडले ! आज बरेच दिवस ज्या हल्ल्याची अपेक्षा आम्हीं करीत होतों तो हल्ला झाला ! मसणबीद ओलांडून मुसलमान लोक कोळीवाड्यावर सरळ चालून आले होते. सुरे, काठ्या फिरवीत, बाटल्या फेंकीत, आरोळ्या ठोकीत, ते सरळ कोळीवाड्यांत शिरले ! धडाधड घरांचीं दारं लागलीं. सुदैवानं मी कोळीवाड्यांतच होतों त्यावेळीं. काशीरामच्या भावाकडे—गणपतकडे—या संबंधीच आमचं कांहीं तरी बोलणं चाललं होतं. “ आले ! आले ! ” करीत कोणी तरी रस्त्या-वरून पळत जात होतं. गणपतबरोबर दहा बारा माणसं देऊन त्याला बंदर वाटेनं मसणबिदीकडे पाठविलं. त्यानं फक्कड कामगिरी बजावली. बाजूच्या मुळवसांत ती जवान मंडळी दबा धरून बसली. मुसलमान चांगले आंत शिरल्यावर गणपत बाहेर पडला. दगडांचा, बाटल्यांचा पाऊस आला तरी संधी साधून त्यांना जाऊन भिडायचं ही माझी सूचना त्यांनीं चांगली अंमलांत आणली. भिंगरीसारखी काठी फिरवीत ती मंडळी मागून येत होती. पुढं सामना द्यायला खुद्द मी होतों. आपण चिमट्यात सांपडत आहोंत हें मुसलमानांच्या ध्यानांत आलं आणि मिळेल त्या वाटेनं

ते पळून गेले. सारा दहा मिनिटांचा खेळ असेल; पण तेवढया अवधींत आमच्याकडील चार माणसं जिवानिशीं गेलीं. आमचा प्रतिकार व्हायच्या अगोदरच ते दुर्दैवी जीव बळी पडले होते; पण ही गोष्ट मला कायमची लागून राहिली. काल काशीराम गेला, आज हे चार तगडे जीव गेले! असंच व्हायचं असेल तर हा सारा खटाटोप कशासाठीं? आपलं कुठंतरी चुकतं आहे असं मला वाटूं लागलं.

ह्या हल्ल्याचा पुढारी कादर होता असं लोक म्हणत होते. प्रतिकारांत खुद्द मी भाग घेतला होता; पण कादरला कुठं पाहिलं नाहीं. गेले कित्येक दिवस कादरचं नांव माझ्या कानांवर येत आहे. त्याच्या घरीं शस्त्रास्त्रांचा भरपूर सांठा केलेला आहे असंहि लोक म्हणत होते. बोटीवर त्याला घ्यायला गेलों त्यावेळीं त्याच्याजवळ बरेच बोजे होते. प्रत्येक बोज्यानं आपल्या वजनानं त्यावेळीं माझी खात्री केली होती! कुणी सांगावं ते सुऱ्यांचेच बोजे असतील! पण याची शहानिशा करण्याच्या भानगडींत मी पडलों नाहीं. मी इतका कामांत होतों आणि अशा कामांत होतों कीं कादर भेटायला येता तरी त्याला मी टाळलं असतं. इतके दिवस आम्ही एकाच जमिनीवर उभे होतों. पण त्यांतील पुष्कळशी आतां ढासळली होती हें नाकारण्यांत हंशील नव्हतं. प्रथम प्रथम असली बातमी आणणाऱ्यांचा मी निषेध करीत असें. तेंहि आतांशीं सोडून दिलं होतं. कार्य—अवरित कार्य; एवढंच मी जाणत होतों.

काशीरामचा खून, कोळीवाड्यावरील हल्ला, हे एकेक टप्पे होते. आतां लोकांचा घबराट साफ गेला. रक्ताला कोणी भिईनासं झालं. साखरपेंडी उकळूं लागली. गुळपेंडी उकळूं लागली. मुसलमानाप्रमाणंच हिंदूंचंही माथं फिरूं शकतं, तोहि अमानुष शौर्य दाखवूं शकतो हें साखर पेंडीच्या मुसलमानांना लवकरच कळायचं होतं.

कोंडी करण्याचे आमचे उपाय ठीक होते. पण रणचंडिका प्रसन्न व्हायची तर तिला सत्यनारायणाचा शिरा चालत नाहीं. नरबलीच्या प्रसादाला ती लालसावलेली असते. तो प्रसाद पुरेपूर अर्पण करायचं आम्हीं ठरवलं. इकडून आम्हीं आणि खाडीकडून गुळपेंडी हा तीक्ष्ण धारेचा चिमटा लवकरच कामाला लागणार होता.

* * *

: २० :

आज सात जानेवारी १९४७ ! आतां रात्रीचे दहा झाले आहेत. आणखी तासा–दीडतासानं मला निघालंच पाहिजे. आत्याला झोप लागली होती. मी विचार करीत माजघरांत पडलों होतों. साऱ्या योजना पूर्ण झाल्या होत्या, बंदुकीच्या गोळ्यांनिशीं आज आम्हांला प्रतिकार होता तरी निदान साखरपेंडीपुरतं तरी पाकिस्तानचं भूत सावित्रीच्या खाडींत गाडल्याशिवाय आम्ही राहणार नव्हतों. प्रत्येक मनुष्य मरायला तयार झाल्यानंतर जगांत अशक्य काय आहे ? माझे विचार चालू होते आणि मागील दारीं टक् टक् ऐकू आली. मी कानोसा घेतला. होय ! कोणीतरी होतं ? कोण ? एवढ्या रात्रीं कोण ? माझ्या माणसांपैकीं कोणी खास नव्हतं. आमची दारावरची थाप ठरलेली होती. ही टक् टक् अनोळखी माणसाची होती. हा हल्ला तर नाहीं ना ? उठलों नी सरळ मागील दारीं गेलों. पुन्हा टक् टक् !

“ कोण आहे ? ”

उत्तराकरितां एका क्षणाचीहि वाट पाहिली नाहीं. भर हिंदुलस्यांत आजच्या या दिवशीं या घरावर मुसलमान जर हल्ला करणार असतील तर रघु बेंद्रेला जिवंत राह्यचा हक्क नाहीं.

मी दार उघडलं. बाहेर कोण होतं ?

अम्माजान, तीन महिन्यांच्या तान्ह्या मुलाला पासोडींत गुंडाळून घेतलेली भाभी आणि छोटा इक्बाल !

गार वारं बंदरावरून आंत येत होतं. थंडी मी म्हणत होती. मोठ्या प्रयासानं भाभी त्या नवबालकाचं रक्षण करीत होती. तिघंहि भीतीनं गारठून गेलीं होतीं. अम्माजान तर कोसळून खालीं पडणार कीं काय असं मला वाटत होतं. पौर्णिमेचा चंद्र आतां चांगलाच वर आला होता. शुभ्र चंद्रप्रकाशांत तें सारं वातावरण अधिकच भयानक दिसत होतं. इकबल हात बांधून थंडीत कुडकडत उभा होता. प्रसंगाचं गांभीर्य लहान मुलांना फार कळतं. आज इकबल माझ्याकडे पाहात सुद्धां नव्हता. झटकन् त्याला मी उचलून घेतलं.

" दादा–? " कानांत पुटपुटावं तसं इकबल बोलला. तोफगोळ्याचं सामर्थ्य त्या शब्दांत होतं.

" काय बेटा ? "

" आम्ही आतां तुमच्याकडे राह्यचं ? "

" हें आपलं घर आहे इकबल. तुला मी आवडतो ना ? "

" अम्माजानसुद्धां ? "

" सगळीं. अम्माजान, भाभी, तूं मी आपण सगळीं इथं राह्यचं ! "

अम्माजानचा मी हात धरला आणि सर्वांना आंत घेतलं. अम्माजान, अशा स्थितींत तुम्ही माझ्याकडे यायच्या होतां ! किती कठोर आहे दैव ! थंडींत कुडकुडत बंदर वाटेनं मैल–दीड मैल चालत ती मंडळी आली होतीं. गांवांतून येणं शक्यच नव्हतं. आत्याला उठवलं. फार हुषार स्त्री ती. न सांगतां तिला सर्व गोष्टी कळल्या ! स्वयंपाक घरांत जाऊन तिनं चहाचं आधण ठेवलं आणि अम्माजानजवळ बसायला आली. एकाच वयाच्या त्या दोन वृद्ध स्त्रिया. प्रथमच एकमेकांना त्या पाहात होत्या; पण एकमेकांची पूर्ण माहिती त्यांना होती. भाभीच्या तान्ह्या मुलाला आत्यानं मांडीवर घेतलं ! मानवतेपुढं आत्याचं सोवळं–ओवळं उडून गेलं ! आत्या पावन झाली. इकबल माझ्याजवळ येऊन बसला. आतां तो बराच धीट झाला होता.

" दादा, चहा ठेवलाय ? "

" हो. थंडी लागत्येना आपल्याला—चहा घेतलं कीं बरं वाटेल. "

" दादा, आमचं घर जाळणार आहेत का हो ? "

" छे रे. कुणी सांगितलं तुला ? असं वेडयासारखं नाहीं बोलायचं. "

" मी नाहीं बोलत. भाभी म्हणत होती. "

" तूं फार बोलतोस ना म्हणून भाभीनं सांगितलं तुला. "

इकबल हंसला ! इकबल, असाच लहान रहा न् हंसत रहा. माणसं पशु बनलीं आहेत. तुझ्याहि नशिबीं तेंच लिहिलेलं आहे. मोठं होऊन पशु होण्यापेक्षां लहान राहून जगांत माणुसकी शिल्लक ठेव. लहान मुलांनीं माणसं होण्याच्या लायकीच राहिलं नाहीं जग.

जरा वेळानं इकबलला पुन्हां कांहींतरी आठवण झाली.

" दादा—असं कां म्हणते हो भाभी ? "

" काय ? "

" आमचं घर जाळणार आहेत म्हणून. किती छान आहे आमचं घर नाहीं ? "

भाभीनं खसकन् इकबला ओढलं.

" या कारटयानं तर घर सोडल्यापासून पिडलं आहे. " एवढं म्हणून भाभीनं त्याला मारायला हात उगारला. मी इकबलला जवळ ओढून घेतलं.

"भाभी, माणुसकी उठून चालली आहे जगांतून. पण जी भीत भीत वावरत आहे तिचा असा अव्हेर करूं नका. "

इकबलच्या डोक्यांत कोणीं भरवून दिलं होतं न कळे; पण त्याची नक्की खात्री झाली होती— ' आपलं घर आज रात्रीं जळणार. ' कावरा बावरा होऊन तो इकडे तिकडे पाहात होता.

मी त्याला उचलून घेतलं. त्यानं भेदरलेल्या दृष्टीनं एकवार माझ्याकडे पाहिलं आणि त्याला रडूं आवरेना. हुंदके देऊन तो रडूं लागला.

" इकबल–इकबल, माझ्याकडे पाहा. असं नाहीं. नीट पाहा. हं आतां हांस पाहूं. नाहीं. तूं रडतो आहेस अजून. "

इकबलनं हंसण्याचा निष्फळ प्रयत्न केला. त्याला कांहींतरी बोलायचं होतं. पण शब्द बाहेर फुटत नव्हता.

" इकबल, बोल ना बेटा. काय म्हणतो आहेस ? "

" मला घरीं न्या दादा. आमचं घर मी जाळूं देणार नाहीं. " जेमतेम तो एवढं बोलला न् त्यानं रडण्याचा आकांत केला. आत्या चहा घेऊन बाहेर आली. त्याला चहा नको होता. त्याचं घर जाळणार होते !

" रघुनाथा, तसा नाहीं राह्यचा तो. आण पाहूं त्याला इकडे. "

आत्यानं त्याला मांडीवर घेतलं आणि ओंव्या म्हणायला सुरवात केली.

छोटूच्या आगरांत—गोड गोड गरे येती
कांटे त्या संरक्षीति—छोटूसाठीं.
आगरी गोड गरे—कांटयांनीं झांकीयेले
गरे खाई छोटूबाळ—इकबलसंगे.
आगरीं गोड गरे—कांटयांनीं झांकीयेले
गोड वाणि झांकी कांटे—माणसांचे.
श्रावणी पौर्णिमेला—साज चढला सावित्रीला
लेंकरांचा लोंढा गेला—दर्शनाला.
मोंगली धाड येई—लुटालूट माजे देशीं
करीं शस्त्र घेई आई—दुर्गादेवी.
रात्रीच्या काळोखांत—मंदगति कोण आला ?
भाग्यवंत साखरपेंडी—रक्षायाला !
पुण्य मोठं लेकरांचं—महापुरुष पाठीराखा
फिरे रात्रीं ' साखर ' स्तोत्रीं—रंगे राया.
फिरे ऽ काळोखांत—सावित्रीच्या डोहीं

" शुभं भवतु साखरपेंडी "—बोले राया.
चैत्रीं पाडव्याला—चैत्रीं नवरात्रीं
पौर्णिमाहि आली देखा—उत्साहाची.
देवीची यात्रा आली—खपे सारी साखरपेंडी
डुले राया, बोले राया—' शताउक्षी ! '
महापुरुषीं स्नान चुकलें—सावित्री कोंपली
तूंच आतां रक्षीं दुर्गे—साखरपेंडी.
विश्व वेढे वन्हीपायीं—आक्रोश पाण्याचा
" संतमुखें व्हावें पाणी "—बोले मुक्ता.
विश्व होई संतशून्य—पेटतां हा वन्ही
कुठं जाऊं पाण्यापायीं—मुक्ताबाई ?
हृदयाच्या भांडीं—मानव्याचं पाणी
ओतूं चला वन्हीमाजीं—शांतवाया.
देवीची यात्रा आली—मियां तेली तेल घाली
तेजाळली सारी ' पेंडी '—प्रकाशानं.
तेल गेलं, तेली गेला—अवघा प्रकाश लोंपला
रक्षी आतां दुर्गा माते—लेंकराला.
अंजलीच्या दीपा—तेल घालीन रक्ताचं
घर रक्षीं दुर्गादेवी—इकबलाचं.

आत्या ! कुठून आणल्यास या ओंव्या ? प्रत्येक ओंवी माझ्या हृदयाचा ठाव घेत होती. त्या स्वर्गसंगतींत गुंग होऊन इकबल झोंपी गेला. शेरल्ली झोंपी जाता तिथं इकबलची काय कथा !

स्वतःच्या रक्ताचे दिवे पाजळून इकबलाच्या घराचं रक्षण करूं पाहाणारी ती आत्या नव्हती; हजारों वर्षांच्या पुरातन कर्णहृदयी हिंदु-संस्कृतीला आत्याच्या मुखानं पुन्हां एकवार वाचा फुटली होती. प्रत्येक घरांत तिचे पडसाद ऐकूं येतील. सातशें वर्षे मुसलमानांनीं ती ऐकली

आणि काय चीज केलं ? अर्भकांच्या रक्ताच्या चिळकांडया, जबरी संभोग, सक्तीचं धर्मांतर, खून, जाळपोळ, लुटालूट ?

हे संस्कृते ! तुला खरोखरच महान् म्हणायचं कां ? एवढे आघात, अत्याचार सहन करून तूं जिवंत राह्यलीस हीं एकच गोष्ट तुझी महात्मता पटायला पुरेशी आहे. तुला शतशः प्रणाम असोत ! पण रक्ताचे दिवे पाजळण्याचा हजारों वर्षं तूं देत आलेला संदेश मात्र मला साफ नामंजूर आहे. क्षमा कर या लेकराला.

" रघुदादा, मोह टाळा ! मी फुकाचा मेलों नाहीं एवढं तरी समाधान मला मिळवून द्या– "

" काशीराम, तुझा अधिकार मला हुकूम करण्याचा आहे. उशीर झाला मला. क्षमा कर. हा मी निघालों. "

इकबलचं मी चुंबन घेतलं आणि घराबाहेर पडलों.

* * *

: २१ :

बाराच्या सुमारास मी घर सोडलं. आमची मंडळी माझी वाटच पहात होतीं. आम्हीं निघालों! कांहीं बंदरवाटेनं निघाले!

दादुमियांच्या पिराशीं आम्हीं आलों. दादूमियांचा पीर! आज पौषी पौर्णिमा! पण आज तिथं शुकशुकाट होता! याच दादुमियांच्या जत्रेंत याच दिवशीं साऱ्या साखरपेंडीचे हिंदु-मुसलमान एक होऊन उत्सव साजरा करीत होते. आतां ते दिवस इतिहासजमा झालेले आहेत. मी हातांत कुऱ्हाड घेतली आणि पुढं झालों. मिराशीदादांना महापुरुषाच्या शापांतून कायमचं मुक्त करायला मीं पुढं झालों! क्षणांच्या अवकाशांत माझी कुऱ्हाड त्या पीरावर येऊन आदळली! लखकन् ठिणगी पडून माझी कुऱ्हाड ताडकन् उलटी फिरली. नाहीं! हिंदु-मुसलमान एकीचा हा समंध मी साखरपेंडीला कदापि राहूं देणार नाहीं! मरत्या पीरा—जगण्याची धडपड तूं कुठवर करणार आहेस? कुऱ्हाडीचा दुसरा प्रहार पीरावर पडला—तिसरा—चवथा—पांचवा! पीर दुभंगला! भराभर जवान लोक पुढं झाले आणि क्षणार्धांत त्या पीराच्या जागेवर सपाटी निर्माण झाली! दादामिराशी—आतां तुम्ही मुक्त झालां आहांत. पीराचे सारे दगड घेऊन आम्हीं निघालों. कोळीवाडा टाकून महापुरुषाच्या डोहाशीं आलों—पीराचे ते फुटके अवशेष डोहाला अर्पण केले. आम्ही पुढं चालूं लागलों. भरतीच्या पाण्यानं सावित्री मस्त झाली होती. पुनवेचं चद्रबिंब तिनं आपल्या हृदयावर धारण केलं होतं. पुनवेच्या प्रकाशांत भरतीचं पाणी वर आलं कीं सावित्रीच्या परिसरांत स्वर्ग निर्माण होतो. मी नी कादर आयुष्यां-

तील कितीतरी रात्रीं या स्वर्गविहारांत घालविलेल्या आहेत. एक काळ असा होता——सावित्री म्हटलं कीं साखरपेंडीचे सारे लोक धर्म—जात—गोत सारं विसरून सावित्रीजवळ यायचे आणि नम्र होऊन वंदन करायचे. सावित्रीचं तें विलक्षण सामर्थ्य आज मानवानं धुळीस मिळवलं होतं. मुसलमानानं प्रेमभरानं सावित्रीला नारळ अर्पण करण्याचे दिवस इतिहास-जमा झालेले आहेत. ती पहा. डोळे फाडून पहा. निरपराध कोळ्यांचीं चार प्रेतं सावित्री वाहून नेत आहे. सावित्री माते——प्रेमाचा नारळ आतां तुला विसरायला हवा. क्षमा कर आम्हा पामरांना——काशीरामाच्या पवित्र रक्तांतून——या निष्पाप कोळ्यांच्या पवित्र रक्तांतून पेटलेली अंतःकरणांतील आग शमविण्याचं सामर्थ्य तुझ्या पवित्र जलांत राहिलेलं नाहीं. दादूमियाच्या पीराचे हे दगड येत आहेत. त्यांना सागराकडे वाहून ने. शेरअल्लीच्या उध्वस्त हाटेलाचे हे अवशेष मान्य करून घे. उस्मान खलाशाची मोडकी होडी—या ट्रंका—या गाद्या—हे गरम कपडे—दागिने—हे जळके ओंडके—सारं, सारं मान्य करून घे. कष्टी होऊं नको. इतके दिवस वैभवांत काढलेस——आतां हा दुर्दैवाचा फेरा आलेला आहे, त्याला आनंदानं तोंड दे. आमच्या रक्तांत पेटलेली आग तुझं अंग रक्तमय झाल्याशिवाय थंड होणार नाहीं.

सूडानं वेडा झालेला तो समूह लाटेसारखा मिळेल तें गुंडाळत फेंसाळत पुढं चालला होता. प्रतिकार? धोंडेफेकीशिवाय दुसरा प्रतिकार नव्हता! बेसावध काशीरामाच्या पाठींत सुरा खुपसणारं शौर्य इथं कामी येणार नव्हतं. मरायला तयार झालेल्या लोकांशीं आतां गांठ होती. इतके दिवस मुसलमान भीत नव्हते का? काय बावळट प्रश्न आहे हा! माणूस जिवंत माणसाला घाबरेल. प्रेतांच्या राशीला कोणी भीत नसतो. प्रेतांना जिवंत करण्याची किमया काशीरामाच्या साखरपेंडीनं केली होती.

आमचा तो लोंढा सावित्रीच्या बाजूनं तसाच पुढं चालला होता. आम्हीं वडाशीं आलों. याच पुराणपुरुषानं साखरपेंडीचं सारं वैभव आज-

वर साजरं केलं. याच्याच साक्षीनं कादरची-माझी पहिली भेट झाली. वृद्ध पुरुषा, शिवकालांत सुद्धां असला विध्वंस तूं पाहिला नसशील. नवी साखरपेंडी आज जन्माला येत आहे—त्याच्या प्रसूतिवेदना आहेत या. स्वागताला तयार रहा. दुःखी होऊं नको.

मी मावळतकडे नजर टाकली—धूर येत होता! मला शंका आली—पुन्हा निरखून पाहिलं. वेड्या मना, कसली शंका घेत आहेस? दिसत नसलं तर नीट पाहा—कादरच्या घराला आत्ताच आग लागली आहे! धांवत मी तिकडे निघालों.

" रघुदादा—तुम्हांलाच बोलवायला चाललों होतों. कादरच्या घरांत काय काय सांपडलय पाह्यला चला." धापा टाकीत गणपतनं मला निरोप दिला.

धांवत मी कादरच्या घराकडे निघालों. सुऱ्यांच्या ट्रंका बाहेर अस्ताव्यस्त पडल्या होत्या. लोक बेहोष झाले होते. एव्हांना गुळपेंडीचे लोकहि आम्हांला येऊन मिळाले.

" रघुदादा आले!" लोकांनीं एकच गिल्ला केला. वरच्या छपराला नुकतीच आग लागली होती. सपाटून दंव पडलं होतं. त्यामुळं आग भडकली मात्र नव्हती.

" गणपत, हें व्हायला नको होतं. काशीरामाचा भाऊ आहेस याचा विसर तुला कसा पडला? कोणतं शौर्य दाखवलंत तुम्हीं?" मी अधिक बोललों नाहीं. ती वेळ नव्हती. घर वांचवायचं असेल तर क्षणहि फुकट घालवून चालणार नव्हतं.

एका अक्षरानंहि मी कुणाला मदतीला बोलावलं नाहीं. माझी सूचना अवमानून त्यांनीं हें कृत्य केलं होतं. पण त्यांना तरी मी कोणत्या तोंडानं दोष देऊं शकलों असतों? कादरच्या घरांत सुऱ्यांच्या ट्रंका सांपडल्या त्याचवेळीं त्यांनीं घरावर हात टाकला. जो त्यांच्या जिवावर उठला त्याला 'वांचवा' सांगायला मला तोंड नव्हतं. कादर माझा मित्र असेल!

असल्या प्राणघातक संघर्षांत मित्रऋणाखातर मला कांहीं करायचं असेल तर माझं मी पाहून घ्यावं ! मला तें पटलं.

आणि मी कामाला लागलों. मियांचा घाणीचा बैल दावणीपासून सोडला. " मोऱ्या—मियांच्या हयातींत त्यांच्या अन्नाला जागलास. आतां शेवटलं एकदांच कामाला लावीत आहें. दगा देऊं नकोस." मोऱ्याला अक्कल फार होती. त्याला मी रहाटाला जुंपलं न् अखेरपर्यंत त्याच्याकडे पहावं लागलं नाहीं. हातणीशीं गेलों. दांडा फिरवला. पाणी मागच्या परसांत आलं. तोंवर आग पसरत होती. लोक पाहात होते. पडवीचं झापाचं छप्पर एव्हांना जळून खाक झालं होतं. मुख्य छप्पर धुमसून होतं. बहालं अजून पेटायचीं होतीं. तीं पेटल्यावर घर वांचविण्याला अर्थ नव्हता. त्याच्या आंत जर कांहीं करतां आलं तर मी पाहात होतों. कळशा बालड्या बाहेर काढल्या. पहिली बालडी भरली आणि घरांत शिरलों. एकस्यानं घर विझवणं वेडेपणाचं होतं. मला तें कळत होतं. पण मला माझं कर्तव्य करायचं होतं. घराचा शेवटचा जळाऊ भाग ठिक्कर पडेपर्यंत धडपडणं माझं काम होतं. घर धुरानं आतां भरलं होतं. पेटत्या छपराच्या प्रकाशानं खालीं चित्रविचित्र छाया पडल्या होत्या. माझं स्वतःचं घर सोडलं तर या घरासारखं मी कुणावरच प्रेम केलं नाहीं.

" जगदंबा ! " साखरपेंडीच्या रक्षणकर्त्या दुर्गामातेचं नांव घेतलं न् सरळ जिन्यानं वरच्या माळ्यावर गेलों. रघुदादा आतां या आगींत जळून नाहींसे तरी होतील नाहींतर आग तरी विझेल एवढी जेव्हां लोकांची खात्री झाली तेव्हां मात्र ते सारे चारशें जवान तुटुन पडले. रहाटापासून घरापर्यंत रांग तयार झाली. भराभर कळशा बादल्या येऊं लागल्या आणि घरावर पाण्याची नुसती धार लागली.

आग विझली ! सारी साफसूफ करीतों आम्हांला चार वाजले. माझा कंठ दाटून आला. आग विझवतांना त्या तरण्या बांड लोकांना

किती वेदना झाल्या असतील याची मला यथार्थ कल्पना होती. केवळ माझ्या प्रेमाखातर त्यांनीं हें केलं. त्यांचे आभार मानून त्यांच्या प्रेमाचा विक्रय करायची माझी इच्छा नव्हती.

पांचच्या सुमारास मी घरीं आलों. गेल्या कांहीं तासांत बेसुमार काळजींतून मी गेलों होतों. शक्तीबाहेर शरीरानं काम केलं होतं. त्या वेळीं मला कल्पना आली नाहीं; पण घरीं येऊन अंथरुणावर लवंडलों नी हातपाय इतके दुखूं लागले—तुकडे पडायची वेळ आली. आत्या जागी झाली.

“ आत्या—झोंपतोय मी. जाग येईपर्यंत उठवूं नको मला. इक्बाल उठला तर त्याला सांग—त्याचं घर शाबूत आहे. ”

“ मी सांगेन हो. झोंप पाहूं तूं आतां. आजारी पडणारेस रघु-नाथा. ”

अंथरुणावर मी अंग टाकलं--झोंप केव्हां लागली मला कळलं नाहीं.

एक तासांतच आत्या मला उठवायला आली ! उठन बाहेर आलों. मिशन हॉस्पिटलचा मनुष्य आला होता. मार्टीनसाहेबांनीं मला तांतडीनं बोलाविलं होतं. निघालों तेव्हां अम्माजान—भाभी—इक्बाल सारीं गाढ झोंपेत होतीं. चार वाजेपर्यंत बिचारीं माझ्या वाटेकडे लक्ष लावून बसलीं होती.

“ आत्या—अम्माजान, भाभी उठल्या कीं बघ त्यांच्याकडे—मी जाऊन येतों. ”

“ लवकर ये रे बाबा--माझा जीव टांगलेला आहे— ”

“ तासाभरांत येतों मी. घरीं येऊन झोंप काढल्याशिवाय चाला-यचंच नाहीं मला आत्या. ”

मी बाहेर पडलों. चालण्याची किंचितसुद्धां ताकद माझ्यांत नव्हती. पण जाणं प्राप्त होतं. इतक्या तांतडीनं डॉ. मार्टीननीं मला बोलविण्याचं काय प्रयोजन होतं ? भवितव्यते--झालं हें पुरेसं नाहीं का ? काय आणखी वाढून ठेवलं आहेस ?



## : २२ :

डॉ. मार्टीन माझी वाटच पहात होते. त्यांनीं मला आपल्या खोलींत नेलं—

" बेंद्रे—या, बसा. इतक्या लांब नको. इथं बसा. हां. कादर हे कोण ? तुमचे मित्र कां ? "

" होय डॉक्टरसाहेब. आमच्या मराठींत दुसरा शब्द नाहीं, तेव्हां मित्रच म्हटलं पाहिजे. पण आमचे संबंध फार निराळे आहेत. कांहीं विशेष झालं आहे का त्याला ? "

" किती घाबरतां तुम्ही ? घाबरण्यासारखं विशेष नाहीं. "

" कादर केव्हां आला तुमच्याकडे ? "

" काल रात्रीं अकरा वाजतां दाखल केलं आहे. काय हो हा कादर म्हणजे तुमच्या अबदुल मियांचा कोणी लागतो का ? "

" मुलगा त्यांचा. "

" वाटलंच मला. नाकाची न् जिव्हणीची ठेवण हुबेहुब तुमच्या मियांसारखी आहे. "

" मियांच्या ऑपरेशनच्या वेळीं एकदां आला होता तो तुमच्याकडे–"

" असं ? लक्षांत नाहीं माझ्या. "

" कितपत जखमा झाल्या आहेत त्याला— ? "

" जखम एकहि नाहीं आहे बेंद्रे; पण जरा काळजी घ्यावी लागेल. जरा म्हणजे चांगलीच. आपण प्रयत्न करून पाहूं. पण फारच थोड्या गोष्टी आपल्या आधीन असतात–तुम्हीं जाणतां. "

" डॉक्टरसाहेब...... ? "

" किती घाबरतां तुम्ही—मला कल्पना नव्हती हो. "

" माफ करा डॉक्टर––पण आतां संकटांचा कळस व्हायची वेळ आली आहे. माणसाच्या सहनशक्तीलासुद्धां मर्यादा असतेच–नाहीं का ?"

मी एवढं बोलत आहे तों मुसलमानवाड्यांतून आगीचे लोळ वर आलेले दिसले.

" ओहो—अजूनहि चालू आहे का दंगल गांवांत ? ती आग पाह्यलीत का ? किती दिवस चालायचं हें बेंद्रे ? "

" सारं विश्वच पेटलं––कोण त्याला पाणी घालणार साहेब ? "

" खरं आहे बेंद्रे तुम्ही म्हणतां तें न् म्हणूनच कौतुक वाटतं मला तुमचं. आज पसतीस वर्षं या गावांत मी येऊन जाऊन आहें. पण तुमचे न् मियांसारखे संबंध कुठं पाहिले नाहींत. "

" पूर्वजन्मींचे लागेबांधे असतात साहेब—"

" काय वाटेल तें नांव द्या त्याला. आज तुमचा मित्र शुद्धीवर आला तेव्हां त्यानंहि तुम्हालाच बोलवायला सांगितलं—मला जरा आश्चर्य वाटलं. "

" म्हणजे कादर शुद्धीवर नव्हता साहेब ? "

" बेंद्रे—तुम्हांला प्रथमच सांगितलं. असं घाबरून चालायचं नाहीं. तो शुद्धीवर नव्हता न् आतांहि नाहीं ! पडेल त्या परिस्थितीला निधडेपणानं तोंड देणं ही कणखर मनाची कसोटी आहे आणि मला माहीत आहे तुम्ही कणखर आहांत. " हंसत हंसत डॉ. मार्टीन म्हणाले.

परिस्थिति गंभीर होती हें आतां मला पुरतं कळून चुकलं. डॉक्टरसाहेब

मला किती हळुवारपणें हाताळीत होते––माझ्या तेव्हांच्या मनःस्थितींतसुद्धां ही गोष्ट लक्षांत आल्याशिवाय राहिली नाहीं.

" बेंद्रे–असल्या आगींत तुमच्या प्रेमानं टिकाव धरावा हेंच किती स्फूर्ति देणारं आहे ! माझं सारं ज्ञान आणि कौशल्य तुमच्या मित्राच्या सेवेला मोकळं केलं आहे. तुमच्यांतील माणुसकीचं चीज यापेक्षां कशानं होणार आहे ? बरं आतां मला असं सांगा -"

" डॉक्टरसाहेब–मला असं अधांतरी ठेवूं नका हो. कादरला नक्की काय झालं आहे, मला सांगूं शकतां कां ? "

" तेंच सांगतोय मी. तुमच्या मित्राला गेल्या कांहीं दिवसांत डोळयाच्या भागाला जोराचा आघात झाला होता ? "

" शक्य आहे. मुंबईला दंग्यात सांपडला होता तो न् किरकोळ जखमाहि झाल्या होत्या. अशा धक्यामुळं कांहीं होतं का–मेनिंजायटीस ?"

" तुमचा तोल सुटतोय बेंद्रे. शांत रहा न् कांहीं कुतर्क करूं नका. अर्धवट ज्ञान मोठं वाईट असतं बघा. माझ्या लहानपणची गोष्ट आहे. कॅन्सरसंबंधीं त्यावेळीं फारशी माहिती उपलब्ध नव्हती. मी त्यासंबंधीं थोडंसं वाचलं आणि मला आपलं सारखं वाटायचं आपल्याला कॅन्सर झाला आहे. अजूनहि होत असतो मला मधून मधून ! हसतां काय–खरंच सांगतोय. तपासून घेतों लगेच. माझी कशानंहि खात्री व्हायची नाहीं. "

" पण ही अशी अधांतरी अवस्था क्लेशदायक नाहीं का वाटत आपल्याला ? "

" खरं आहे तुम्हीं म्हणतां तें. तुम्हीं काय म्हणालांत-तुमच्या मित्राला किरकोळ जखमा झाल्या होत्या—? "

" होय "

" किती दिवसांपूर्वी—? "

" गेल्या सप्टेंबरमध्यें. "

" आणि घरगुती उपचार करून त्या जखमा बऱ्या झाल्या —? "

" हो. "

" अस्सं ! " अतिशय चमत्कारिक स्वरांत डॉ. मार्टीन बोलले. त्यांच्या प्रत्येक प्रश्नाला माझ्या छातींत धडधडत होतं. हळुवारपणें ते माझ्याकडून कादरच्या दुखण्याचा पूर्वेतिहास काढून घेत होते. दर प्रश्नाला मला वाटे--" यामुळं तर कांहीं भयंकर दुखणं कादरला आलं नाहीं ? " मी त्यांना शेवटीं विचारलं--

" डॉक्टरसाहेब--यामुळं कांहीं वेडंवाकडं होणं शक्य आहे का ? "

"बेंद्रे, वेडंवाकडंच व्हायचं असेल तर त्याला अमुकच कारण लागतं असं कांहीं नाहीं. नुसतं खरचटल्यामुळं धनुर्वात झालेला ऐकिवांत आहे तुमच्या ? पण असे प्रकार घडतात हें तितकंच खरं आहे. तुमच्याच मित्राचं पाहा--मुंबईला एवढीं हॉस्पिटल्स असतांना तिथं जाण्याची त्याला बुद्धि होऊं नये, याला काय म्हणायचं ? तुम्ही लोक एक गोष्ट विसरतां--क्षुल्लक जखमेंत सुद्धां माणसाचे प्राण घेण्याचं सामर्थ्य कित्येक वेळां असतं. तुमच्या मित्राच्या डोक्याला आंतल्या बाजूनं सध्यां रक्तस्राव चालू आहे त्याचंहि कारण या सप्टेंबरमध्यें झालेल्या जखमाच आहेत. "

" आंतल्या बाजूनं रक्तस्राव ? मला कळलं नाहीं आपण काय म्हणतां तें. "

मेंदूवर जे पापुद्रे असतात त्यांच्या आंतल्या बाजूनं हा रक्तस्राव होत असावा. यामुळं मेंदूवर अतिशय दाब पडतो. रुग्णाच्या बेशुद्धीचं हेंच कारण असतं. "

" यावर कांहीं इलाज नाहीं का ? "

" इलाज ! डॉक्टर शेवटच्या घडीपर्यंत इलाज करीत असतो बेंद्रे. पण शास्त्र एवढं पुढं जाऊनसुद्धां मानवाचं सामर्थ्य किती तोकडं पडतं पाहातां तुम्ही. तरीपण तुम्ही कांहीं काळजी करूं नये. "

" मला आपण सांगताहांत काळजी करूं नका; पण तुम्हीं स्वतः--"

" असं पाहा, रोग्याची काळजी करणं हें प्रत्येक डॉक्टरचं व्रत असतं हें व्रत ज्याच्याजवळ नाहीं तो चांगला डॉक्टर होणं शक्य नाहीं. तें जाऊं दे. पूर्वी तुमचे मित्र कधीं आजारी होते का ? "

" नाहीं–कधींच नाहीं. निकोप प्रकृतीचा आहे तो. "

" हंसून खेळून असायचा—? "

" हो. "

" कधीं दुर्मुखलेला नसे ? "

" कधींच नाहीं. नाहीं म्हणायला गेले कांहीं दिवस तो चिडखोर झाला होता. "

" म्हणजे मुंबईला दंग्यांत सांपडल्यानंतरपासून ? "

" होय. चिडखोर म्हणजे......... "

" मधुनच चिडायचा ? "

" हो. "

" माथेफिरूसारखा चिडायचा ? "

" शक्य आहे. मला अनुभव नाहीं, पण ही गोष्ट अशक्य नाहीं. त्यानं इतकीं संकटं आणि आपत्ती लहानशा अवधींत भोगल्या आहेत–मला त्याच्या स्वभावाचं कधीं आश्चर्य वाटलं नाहीं. "

" दंग्याबद्दल तुमच्याजवळ कधीं बोलायचा का तुमचा मित्र ? "

" फारसं नाहीं. बहुधा हा विषय तो टाळीत असे. "

" कधीं असंबद्ध बोलायचा—? "

" शक्य आहे— "

" मध्येंच बोलायला लागायचं–मध्येच थांबायचं...? "

" कांहीं कांहीं वेळां करायचा असं तो. कां ? चांगलं नाहीं का तें ? "

" छे, छे. असा गैरसमज करून घेऊं नका बेंद्रे. अर्धवट असेल तोच सारखा बडबडत राहील; नाहीं का ? डोकं दुखीची तक्रार तुमच्या मित्राला गेले कांहीं दिवसांत होती ? "

“ हल्लीं ही त्याची नेहमींची तक्रार झाली होती. ”

“ आणि मग ॲस्प्रो खायचा ? ”

“ अक्षरशः खरं आहे साहेब. वाईट ना तें ? मी त्याला कितीतरी वेळां सांगितलं. पण हें पुढं वाढून ठेवलं होतं त्याला तो तरी काय करणार ! ”

मुसलमानवाड्यांत अजून धुमःश्चकी चालू होती. आम्हीं हॉस्पिटल-मध्यें बसलों होतों तेथून दगडफेंक स्पष्ट दिसत होती. हॉस्पिटलच्या दिशेनं कोणी तरी धांवत येत होतं–गणपत होता तो. मी बाहेर आलों.

“ दादा, आराम पोलीस आलायत नी धरपकड चालूं आहे. सदु वर्तक, तुमचे बन्यादादा, सदु महार यांना पकडून नेलंय. लोक पोलिसांना जुमानीत नाहींत. इब्राहीम फौजदारानं मारहाणीला सुरवात केली आहे. मुसलमानवाडा पुरता बसल्याशिवाय लोक हटायचे नाहींत. गुळपेंडीचे सारे भंडारी इकडे उतरले आहेत. तुम्हीं बिलकूल काळजी करूं नका आणि इथून बाहेर पण पडूं नका. तुमच्या शोधांत आहेत पोलीस. बाहेर आलांत तर पकडतील. ”

“ गणपत—सगळयांनीं घराचा रस्ता ताबडतोब पकडा. बेकार मरण एकालाहि आलेलं मला खपायचं नाहीं. जा––पळ. ”

गणपत परत फिरला आणि निमिषार्धांत नाहींसा झाला.

“ डॉक्टरसाहेब, दंगा कमी होण्याचीं लक्षणं नाहींत. बरीच गडबड आहे आज गांवांत. ”

बेंद्रे, तुम्ही काय न् मी काय––आपण कार्य करीत राह्यचं. तुमच्यासारखा जरी एक मनुष्य शिल्लक राहिला तरी मी निराश होणार नाहीं. त्यालाच कोंब फुटेल आणि मानवतेचं रोपटं पुन्हा एकवार वाढीस लागेल. प्रभात उगवेल असा विश्वास मात्र पाहिजे. आतां असं पाहा; सात वाजलेत आतां. तुमची पुण्याई आणि माझं कौशल्य आपण इरेस घालूं. मला फार आशा नाहीं हें अगोदर सांगतों–– ”

“ डॉक्टरसाहेब–– ! ”

" होय—खरं तें मी बोलतों आहे. मला वाटलं एथवर तुम्हीं समजलां असाल—— "

" मी इथं आलों आणि लगेच समजलों हो ! तरी मला आशा वाटत होती. तुम्हीं निराळं—आशादायक कांहीं तरी सांगाल——"

" बेंद्रे, मलाहि आशा वाटत होती——मी कांहीं तरी निराळं तुम्हांला सांगू शकेन. पण जो पूर्वेतिहास आणि लक्षणं तुम्हीं मघां सांगितलीं त्यापासून एकच निष्कर्ष निघत आहे–तुमचा कादर या दुखण्यांत निभावणं कठीण आहे. मला आशा नाहीं. माझ्याजवळ योग्य तीं उपकरणंहि नाहींत. पण तुमचा मित्र वांचलाच तर शस्त्रक्रियेंत वाचेल. तीच एक आशा आहे. अच्छा—"

आणि डॉ. मार्टीन लगबगीनं उठले. ऑपरेशन टेबलावर कादरला घेण्यांत आलं, आणि थोड्याच वेळांत तो नामांकित सुश्रुत कादरच्या मृत्यूशीं झुंज खेळूं लागला. अकराचे सुमारास शस्त्रक्रिया संपली. कादरला स्ट्रेचरवरून त्याच्या कॉटवर नेण्यांत आलं. डॉ. मार्टीन बाहेर आले.

" डॉक्टरसाहेब, फार थकलेला दिसतोय कादर ? "

" हा काय प्रश्न करतां बेंद्रे ? केवढी शस्त्रक्रिया होती कल्पना आहे तुम्हांला ? "

" डॉक्टर–कांहीं आशा आहे का ? "

" बेंद्रे–या आरामखुर्चीत बसा पाहूं आधीं. असं घाबरून नाहीं चालत जगांत. चांगलं कार्य करीत राहावं–फळ मिळेल कीं नाहीं इकडे लक्ष देऊं नये. तुमच्या गीतेची ही शिकवण मला फार आवडते. आपण चहा घेऊं या——"

चहा आला. डॉ. मार्टीन चहा पिऊं लागले. शून्याकडे दृष्टी लावून त्यांनीं बोलायला सुरवात केली. त्यांच्या त्या विलक्षण दृष्टीनं मला सर्व कांहीं सांगितलं होतं. माझे डोळे ओले झाले.

" हें पाहा बेंद्रे–तुमच्या मित्रावर तुमचं प्रेम आहे ? "

" हो. "

" नुसतं हो म्हणून नाहीं चालायचं. माझी खात्री पटली पाहिजे. डोळे पुसा पाहूं--"

" शस्त्रक्रिया निरुपयोगी ठरली का ? "

" होय ! मानेवरचे ज्ञानतंतु निकामी झाले आहेत. "

" यावर कांहीं इलाज नाहीं का ? "

" वीस ग्रेन सल्फानिलमाईड दिवसांतून चार वेळां देणं ! " इतक्या भावनाशून्य स्वरांत डॉ. मार्टीननीं हे शब्द उच्चारले--थरारून गेलों मी.

" त्यानं काय होईल ? "

" उद्यां सकाळीं तुमचा मित्र शुद्धीवर येईल. चांगला हुशारींत असेल--व्यवस्थित बोलणंहि शक्य आहे. "

" आणि मग--? "

" संध्याकाळपासून कांहीं दुष्ट चिन्हं दिसूं लागतील. ताप वाढेल, मधूनच शुद्धी जाईल......

पुढच्या चोवीस तासांत ताप सारखा वाढत राहील. गुंगीचा जोर वाढेल.......

आणि आणखी कांहीं तासांत......

तुमचा मित्र इहलोकाची रजा घेईल ! "

" डॉक्टर--डॉक्टर...... ! "

" बेंद्रे ! तोल जातोय तुमचा ! मित्रकर्तव्य अजून संपलेलं नाहीं. सारं धैर्य एकवटा--आणि--कामाला लागा. घरीं काम असेल तर जाऊन या. तुमचा मित्र शुद्धीवर येईल तेव्हां चातकासारखी तुमची वाट पाहात असेल. "

" डॉक्टर साहेब, माझी मुळींच काळजी करूं नका. रघु बेंद्रे आतां फत्तर झाला आहे. माझ्यावर आपले फार, फार उपकार आहेत. "

डॉक्टरसाहेबांचे मी पाय धरले. ऊष्ण अश्रूंचे कांहीं थेंब त्यांच्या पायावर पडले. माझ्या डोळ्यांतून आलेले ते शेवटचे अश्रु होते.

मी बाहेर आलों. वातावरण अजून शांत झालं नव्हतं. यावेळीं घरीं जायला निघायचं म्हणजे सरळ पोलीसच्या हातीं पडायचं एवढाच अर्थ होता. वाटेल तें करून मला तें टाळायला हवं होतं.

कादर अजून शुद्धीवर आला नव्हता. दोन तीन वेळां मी त्याच्या-जवळ गेलों. पण त्यानं मला ओळखलं नाहीं.

——आतां चांगला काळोख पडला होता. मी घरीं जाऊन यायचं ठरविलं. जाणं सोपं नव्हतं. पोलीस पाळतीवर असणार. समजा, पकडला गेलों तर ? कैदेला मी भीत नव्हतों–पण मागं काय होईल! पाऊणशें वर्षांच्या अम्माजान–भाभी–छोटा इकबल! काय करतील? कुठं जातील या दिवसांत? कादर जाणार हें निश्चित होतं! छे, छे. वाटेल तें होवो; पण मी पोलीसच्या हातीं लागणं म्हणजे नाश आहे साऱ्यांचा.

—आणि घरीं तर गेलंच पाहिजे!

'रघु–विचार करण्यांत अर्थ नाहीं. कर्तव्य करीत राहाणं एवढं तुझ्या हातीं आहे. घरीं चालूं लाग. याउपर ईश्वराची इच्छा!'

रात्रीं दहाच्या सुमारास पिऱ्याचा डोंगर तुडवीत मी ब्राह्मणवाडींत आलों. दारावर टिचक्या वाजवल्यावर——टक्——टक्——

मला आठवण झाली–कालच्या रात्रीं याच वेळेला माझ्या दारावर टक् टक्चा आवाज आला होता. निर्वासित अम्माजान, भाभी, इकबल धडधडत्या अंत:करणानं दार उघडण्याची वाट पाहात होती. तीच–अगदीं तीच धडपड आज माझ्या छातींत चालली होती! आतां अम्माजान समोर उभ्या राहतील! काय सांगू त्यांना? काय सांगू भाभीला! काय सांगू इकबलला? कोणत्या शब्दानं या दुःखी जीवांचं समाधान मी करणार होतों?

एक रात्र आणि एक दिवस ! आयुष्यांत जेवढीं दुःखं मला दाखविण्याचं विधात्यानं ठरविलं होतं, त्या सर्वांची मोटळी करून या चोवीस तासांकरितां त्यानं जणूं राखून ठेवलीं होतीं.

आत्यानं दार उघडलं. मी आंत आलों. अम्माजान माजघरांत कपाळाला हात टेकून बसल्या होत्या. त्यांना दुःख सहन करण्याची ताकद राहिली नव्हती.—गेल्या चोवीस तासांत त्यांचं वृद्धत्व दहा वर्षांनीं वाढलं होतं. भाभी जवळच बसली होती. त्या नाजूक देहावर केवढं दुःख भोगण्याचं विधात्यानं लादलं होतं ! दोन महिन्यांचं मूल मांडीवर घेऊन ती पेंगत बसली होती. इकबल रडून रडून शेवटीं तिच्या मांडीवर झोंपला होता. मी गेलों आणि त्या दोघांजवळ जाऊन बसलों.

" अम्माजान ! मी तुमचा रघ्बा... "

" रघ्बा-कादर कुठं आहे ? आज सकाळी तो इकडे येणार होता; तूं गेलास, तुझाहि पत्ता नाहीं—"

" माफ करा अम्माजान–आमच्या दोघांच्या हातून असं झालं खरं—"

" कादर कुठं आहे— ? "

" हॉस्पिटलमध्यें. "

" इस्पितळ ! इस्पितळ ! काय झालं कादरला रघ्बा–! या अल्ला."

" अम्माजान, भाभीकडे पाहा–इकबलकडे पाहा—हें काय चालवलंय तुम्ही—एवढं भिण्यासारखं कादरला कांहीं झालेलं नाहीं—"

" मग हॉस्पिटलमध्यें कशाला नेलंत त्याला—? "

" त्याचं डोकं दुखत होतं ना ? तोच विकार जास्त झाला आहे. उद्यां सकाळपर्यंत त्याला बरं वाटेल—"

" रघ्बा–मी हॉस्पिटलमध्यें जातें– " आणि अम्माजान–भाभी खरोखरच उठूं लागल्या. मी बसवून घेतलं.

" अम्माजान—गांवांत गोळीबार चालू आहे—"

"रघ्बा–मग मला जाऊं देच. माझा बच्चा मला भेटूं दे नाहीं तर गोळीखालीं माझा जीव तरी जाऊं दे. मला तूं अडवूं नको."

" तुम्हांला जीव नकोसा झाला आहे––पटतं मला अम्माजान–पण मी कसं तुम्हाला बाहेर जाऊं देईन ? गावांत दंगा अजून चालू आहे. भाभीकडे पाहून तरी विचार करा. कांहीं वेडा वांकडा प्रकार झाला तर कसं तोंड दाखवूं मी कादरला ? मी कादरची काळजी घेणार नाहीं असं नाहींना वाटत तुम्हांला ? "

" नाहीरे रघ्बा–असं कसं वाटेल–पण तो इस्पितळांत आहे आणि माझा जीव इथं कसा राहील घड— "

" मला सारं पटतं पण तरीसुद्धां असल्या दंगलींत तुम्हीं येऊं नये. "

अम्माजान यावर कांहीं बोलल्या नाहींत. निश्चेष्ट मनःस्थितींत त्या कपाळाला हात लावून बसल्या होत्या.

पहाटेखालीं मी घरांतून बाहेर निघालों. कावऱ्या बावऱ्या नजरेनं भाभी माझ्याकडे पाहात होती. ते दीन झालेले चेहरे मला पाहावत नव्हते.

" अम्माजान–मी जाऊन येतों " एवढे शब्द मी बोललों मात्र. भाभीनं येऊन माझ्या मानेला विळखा घातला ! गाईनं हंबरडा फोडावा तसे तिच्या तोंडांतून शब्द बाहेर आले––

" दादा ! घन्यांना लवकर आणा हो परत ! "

कसाबसा मी घराबाहेर पडलों. पुनवेच्या शांत प्रकाशांत माझी साखरपेंडी आज तडफडत होती. असंख्य चांदण्या आकाशांत प्रकाशत असतात; पण तिमिराचं साम्राज्य कमी करण्याचं सामर्थ्य त्यांच्यांत नसतं. एक माणुसकी वजा केली तर माणसाची स्थिती तरी या चांदण्यांसारखीच नाहीं का ? जिवंत माणसं वावरत असूनहि साखरपेंडीचं स्मशान आज

कुणी केलं– ? भाभीसारख्या किती स्त्रिया आज मुसलमानवाड्यांत–हिंदु-लत्त्यांत अश्रु ढाळीत असतील. कुणी केल हें सारं ?

माणसानं ! साऱ्या हिंदु–मुसलमानांनीं !

वेड्या रघुनाथा ! कां अशी वंचना करतो आहेस ? मुसलमानांच्या दावणींत निरपराध हिंदूंना कां बांधतो आहेस ? साखरपेंडीचं स्मशान कोणी केलं ?

हिंदु–मुसलमानांनीं ?

नाहीं ! त्रिवार नाहीं ! द्वेषावर आधारलेला पाकिस्तानी प्रचार ज्यांनीं केला त्यांनीं हें स्मशान केलं !

खरंच ?

नक्की !

हिंदूंनीं नाहीं ?

नाहीं !

खोटं आहे ?

हें रोकडं सत्य आहे !

नाहीं !

होय !

नाहीं !

नाहीं ! !

नाहीं ! ! !

रघुनाथ ! काय हे नसते विचार करतो आहेस ! पाय उचल !

गेल्या रात्रीं कादरचं कांहीं बरं वाईट कशावरून झालं नसेल ? काय चालविलं आहेस हें ? फुकट घालविलेल्या कांहीं क्षणामुळंसुद्धां पश्चा-ताप करण्याची वेळ येईल. अंतर्वैरी होऊं नको ! पळ !

धांपा टाकीत मी हॉस्पिटलमध्यें प्रवेश केला.

कादर हयात होता !

चातकासारखी माझी वाट पाहात होता !

" रघु, किती वेळ वाट पाहातोंय तुझी ! "

एकमेकांच्या जिवावर उठलेल्या दोन जमातीचे म्होरके ! आम्ही एकमेकांच्या बाहुपाशांत गुरफटलों.

" हुषारींत आहेस कादर आज ! "

" छान वाटतंय आज. पोटाला थोडीशी तडस आहे—पण डोकं अगदीं हलकं वाटतंय. "

खरोखरच कादर फार हुषारींत होता. अशीच सुधारणा टिकली तर ? कुणी सांगावं कादर चांगला बराहि होईल. हिंडू-फिरूं लागेल—पुन्हां इकबलभाभीला भेटेल. डॉक्टरांचे सारेच अंदाज कांहीं बरोबर ठरतात असं नाहीं. मार्टीनसाहेबाचे शब्द तोफगोळयासारखे माझ्या कानांत शिरले--

" उद्यां सकाळीं तुमचा मित्र हुषारींत असेल ! "

"रघु—गेल्या कित्येक दिवसांत मला एवढीं हुषारी वाटली नव्हती."

" मार्टीन साहेबांचे आपल्यावर फार उपकार आहेत कादर. मुंबईला सुद्धां ही शस्त्रक्रिया होणं कठीण पडलं असतं. आतां तुला कांहीं धोका नाहीं. "

" खरंच ? "

" अगदीं खरं. "

" रघु—वृश्चिक राशीचं हल्लीं कसं आहे रे ? "

" फार चांगले ग्रह आहेत या राशीला कादर—तुझा गुरु फार हात देणार आहे. वाटेल तीं संकटं आलीं ना तरी तुला मरूं देणार नाहीं."

कादर हंसला !

" आणखी एक दोन आठवड्यांनीं मी मोकळा होईन, नाहीं ? "

" हो—फार तर तीन आठवडे. "

" इकबल कुठं—तुझ्याकडेच ना ? "

" हो-काय हुदडत असतो विचारूं नको ! अम्माजान-भाभी-- दोघांना वेळ जायची पंचाईत नाहीं. सारीं आनंदांत आहेत. "

" त्यांना घेऊन का नाहीं आलास ? "

" अरे आणणार होतों--पण ही दंगल चालू आहे ना अजून. "

" रघु-मी बरा झालों कीं आपण साखरपेंडी सोडून दूर-लांब जाऊं कुठं तरी—अगदीं लांब. जिथं माणूस माणसाला माणूस म्हणून ओळखतो असं एकादं ठिकाण शोधून काढ-आपण तिथं जाऊं. "

" कादर-आतां बोलूं नको. थकवा येईल हं अशानं. "

"नुसतं पडून राह्यचा कंटाळा येतो रे. हे पांढरे पट्टे मला खराब दिसत असतील, नाहीं ? हें पाहा-माझं डोकं-मान सगळं गुंडाळून टाकलं आहे कीं यांनीं ! बरं झालं आज इकबलला आणलं नाहींस तें. घाबरेल तो माझा असला अवतार पाहून. इकबल रडत नाहीं ना ? "

" छे रे. तुझी आठवण एक दोनदां काढली होती त्यानं; पण तेवढंच तें. पुन्हां लागला खेळायला— "

" पक्का गुंड आहे तो— "

कादरचा आवाज मंदावत होता. त्याचा हात मी हातांत घेतला. मी एकदम घाबरलों. किती गरम लागत होता ! सारखा पांघरुणांतच होता. त्यामुळं गरम झाला असावा. कादरला झांपड आली.

मी चहा मागवला न् पीत होतों. कादर जागा झाला.

" रघु तहान लागल्ये रे-- "

" हा घेना तुलाच आणलाय चहा-- " त्याला मी चहा पाजूं लागलों तों त्याला ठसका लागला. त्याच्या तोंडांतला चहा माझ्या अंगावर उडाला. झटकन् हात बाहेर काढून तो पुसूं लागला.

" असूंदे-असूं दे कादर-- " जबरीनं त्याचा हात मी मागं केला.

" किती दिवस चालायचं असं रघु ? शब्दाला खरा जागतो आहेस ! " कादरचे डोळे डबडबले.

" तूं असं करणार असशील ना कादर तर मी राहणार नाहीं इथं--"

" बरं नाहींरे वाटत अशी सेवा करून घ्यायला—"

" कळत नाहीं का मला-? पण वेळ आली म्हणजे करून नको का घ्यायला ? माझ्यावर प्रेम केलंस-आतां ही आपत्ती तुला सहन केली पाहिजे. तुला लवकर बरं व्हायचं आहेना- ? "

" हो. "

" मग असं त्रास करून कसं चालेल बरं ? थकवा नाहीं का येणार ? "

" हो. " लहान मुलाची समजूत घालावी न् त्याला पटावं तसं कादर बोलत होता.

" रघु, नको आहे मला चहा-तूं घेऊन टाक. "

दुपारच्या सुमारास डॉ. मार्टीन कादरच्या वार्डमध्यें आले.

" बेंद्रे ! काय म्हणताहेत तुमचे मित्र ? "

" बरं वाटतंय साहेब कादरला आतां--"

डॉ. मार्टीननीं कादरचा हात हातांत घेतला. किलकिले डोळे करून त्यांनीं वर पाहिलं आणि हात अलगद खालीं ठेवला.

" महाराज-तुमच्या मित्रांना आतां सोडा कीं जरा--"

" डॉक्टरसाहेब, माफ करा पण असं कांहीं सांगू नका. तो बाहेर जायचीच वाट माझे प्राण पाहात असतील. "

" अहो पण त्यांना जेवण तरी घेऊं द्याल की नाहीं-अशानं आजारी पडतील ते. "

" जा तूं रघु, पण लवकर ये हं. "

" मी जेवलों कीं आलों. "

" पोक्ष्यांना थापा मारीत होतास तशा नको मारूं---! "

कादर हंसत हंसत बोलत होता. तो चांगलाच हुषारींत होता.

" चिठी हरवली म्हणून तूं सुद्धां थाप मारली होतीस एकदां पोक्ष्यांना --विसरूं नको--"

" खरं आहे-पण तुझ्याइतकं साधलं नाहीं रे मला कधीं--! "

" असं होय-! बरं, मी जाऊन येतों "

संध्याकाळीं पुन्हां घरीं जाऊन आलों! त्या घरांत दोन जीव तळमळत होते. उकळत्या कढईत जिवंत वस्तुला टाकल्यावर त्याची जी तडफड चालते ती सारी तडफड अम्माजान-भाभी यांच्या तोंडावर दिसत होती. कसलं सांत्वन आणि काय! त्या रात्रीं कांहीतरी बोलत होतों मी. त्यांना हॉस्पिटलमध्यें आणण्याची सोय नव्हती. रात्रीची संचारबंदी होती. कुठं नेणार त्यांना या गडबडींत? मी स्वतः पिन्याच्या डोंगरांतून लपत छपत घरीं यायचों. पोलीसांशीं थोडंफार संधान होतं म्हणून हें तरी शक्य झालं.

मी पहांटे परत फिरलों. आजची वेळ टळली तर? तर? डॉक्टरांचे अंदाज कांहीं नेहमींच खरे ठरतात असं नाहीं. कशावरून?......... समजा!......समजा!

कादरच्या खोलींत शिरलों तेव्हां तो पुटपुटत होता कांहीं तरी.

" काय झालं कादर? "

" मी असं म्हणत होतों......... "

" बोल--? "

" आजचा वार कोण—? "

" गुरुवार. "

" परवां पौर्णिमा झाली ना? "

" होय. "

" तुला आठवतं? "

" काय—? "

" काल आपला वाढदिवस झाला लक्षांत आहे तुझ्या ? जत्रेच्या दुसऱ्याच दिवशीं आपण वडाखालीं भेटलों होतों, नाहीं ? "

" होय कादर—— "

" पुढच्या वर्षीं आपण हा वाढदिवस चांगला साजरा करायचा हं. रघु—खरंच आपलं घर पाहून ठेवलंस का ? जिथं भांडण नाहीं, तंटा नाहीं—तिथं आपण जाऊं—तूं—वैनी—छोटू—तुझ्या अत्या—मी—अम्माजान—भाभी—इकबल—आपला वाढदिवस तिथंच साजरा करायचा हं...... "

कादरचे ओंठ किंचित विलग झाले. त्याचे डोळे पुन्हां मिटले.

आतां ती खोली भयाण दिसत होती. मी नी कादर दोघेच होतों खोलींत. भिंतीवरच्या घड्याळाचे ठोके केवळ्यांनीं ऐकूं येत होते ! एकाकीपणाची एवढी जाणीव मला कधींच झाली नव्हती.

डॉ. मार्टीन आंत आले. त्यांनी कादरची नाडी पाहिली.

" कसं आहे डॉक्टरसाहेब ? " मी त्यांना विचारलं. पण लगेच माझ्या लक्षांत आलं—किती मूर्ख प्रश्न हा !

डॉक्टर बाहेर गेले. ते जायचीच जणुं कादर वाट पाहात होता. तो पुन्हां बडबडूं लागला. फारच चमत्कारिक आवाजांत तो बोलत होता. मी जवळ गेलों. त्याचे डोळे सतेज होते. त्याच्या ओठांची कांहींतरी हाल-चाल झाली.

" पाणी पाहिजे कादर ? "

" नको. तुझ्या कपाळीं गंध दिसत नाहीं रघु ? "

कादर ! मला तूं रडविणार आहेस का ? काय उत्तर देऊं तुला ? ही अशी वेळ आली शेवटीं !

" रघु, मला पाणी देतोस कारे थोडंसं ? "

कादरच्या तोंडांत मी पाण्याचे थेंब टाकले. ओंठावर पडलेले थेंब पाहतां पाहातां वाळून गेले. ताप विलक्षण वाढला होता.

डॉ. मार्टीन आंत आले.

" बेंद्रे, तुम्हीं चहा प्यायला येतां का ? "

" माफ करा साहेब—माझी मुळीच इच्छा नाहीं. मी इथंच बसून राहतो.

" वेडे आहांत बेंद्रे ! इथं तुम्हीं बसलांत तरी कादरला तुमचा कांहीं पत्ता असणार नाहीं त्याचा. " भावनाशून्य आवाजांत डॉक्टर बोलले.

" खरं आहे डॉक्टर. सारं दिसतंय मला. पण कादरला असंच टाकून येऊं का ? तुमच्याबरोबर बाहेर येईन आणि अंतर्वैरी मात्र होईन. तुम्हीं जा. विश्रांतीची जरूर माझ्यापेक्षां तुम्हाला आहे. शेवटच्या क्षणापर्यंत मला इथंच राहूं दे. "

डॉ. मार्टीनचे डोळे गेल्या दोन दिवसांत प्रथमच तरारले. त्यांनीं माझ्या हाताचं चुंबन घेतलं न् हलक्या पावलानीं ते बाहेर पडले. त्यांना पोंचवायला उंबऱ्यापर्यंत मी गेलों.

लांब अंतरावर अम्माजान— भाभी—इकबल—अडखळत-धडपडत हॉस्पिटलची वाट चालत होतीं. तिथूनच मी मोठ्यानं ओरडलों.

" दुर्दैवी जीवांनों थांबा ! अंतर्वैरी होऊं नका, थांबा ! "

पण माझे ते शब्द तोंडावाटे बाहेर पडले कीं नाहीं मला कळलं नाहीं. हतबुद्ध होऊन मी कादरजवळ येऊन बसलों.

**– स मा प्त –**